# योग्य शासन

करंदीकर रामचंद्र चिंतामण

१९०३

# प्रस्तावना.

प्रस्तुत नाटकें व कादंबऱ्या यांचे वाचक फार सांपडतील. ह्याचा अनुभव लायब्रऱ्या व ग्रंथसंग्रहालयें यांस चांगलाच असेल. ज्यास ज्या वस्तूची आवड त्यास त्या वस्तूचा उपभोग घेण्याची प्रबळ इच्छा असणें साहजिकच आहे; परंतु प्रस्तुत पुस्तकाचा सर्व वाचक आवडीनें उपभोग घेतील ह्या उमेदीनें हें वाचकवर्गापुढें आणण्याचें धाडस करीत आहें. व्यवहारांत नेहमी अनुभवास येणाऱ्या ठळक ठळक गोष्टी नजरेस याव्या हा मूळ हेतु आहे. कृष्णरावास त्याच्या दुष्कृत्यांबद्दल योग्य शासन, त्याचा पश्चाताप, विश्वासरावाची उदार बुद्धि, सुशिलेचें पातिव्रत्य, तात्यासाहेबांचा विश्वासरावास अनुभवसिद्ध उपदेश व सोन्याची स्वामिभक्ति या गोष्टींचा स्पष्ट उल्लेख केला आहे.

उत्साह प्रीत्यर्थ वर्षांतून एखादे वेळीं नाटकाचा प्रयोग करणारी मंडळीही बराच आढळते त्या मंडळीस मुख्यत्वें करून अडचण ह्मटली ह्मणजे नाटकांत स्त्रीपात्रें जास्त. ज्यांचा नाटकाचा धंदाच असतो त्यांस याबद्दल फिकिर वाटणार नाहीं परंतु अशा एखादे वेळीं प्रयोग करणाऱ्या मंडळीस फार जड जातें; इतकेंच नव्हे तर एखादेंच स्त्री पात्र तयार करावयाचें ह्मटलें ह्मणजे बोलण्यास अती संक्षेप रूप देणें भाग पडतें तरी ही अडचण ह्या पुस्तकानें दूर होईल अशी आशा आहे.

मुंबई, गिरगांव,
सन १९०३.

पुस्तककर्ता.

# योग्य शासन नाटक.

## पात्रें.

**नारायणराव ऊर्फ तात्यासाहेब**–कांतिपूरचे बडे सावकार ( विश्वासरावाचा बाप. )

**गोपाळराव ऊर्फ आण्णासाहेब**–कांतिपूरचे एक सावकार ( कृष्णरावाचा बाप. )

**विश्वासराव**–बडे सावकारपुत्र.

**कृष्णराव**–सावकारपुत्र ( विश्वासरावाचा स्नेही. )

**विष्णुशास्त्री**–तात्यासाहेबांकडील शास्त्रीबोवा.

**सुशिला**–कुमारिका ( जनूभटजीची मुलगी व विश्वासरावाची पत्नि. )

**सदोबा**–तात्यासाहेबांचे दिवाण.

**जनूभट**–एक भिक्षुक.

**गणपतराव**–जवाहीर, सोनें, चांदी वगैरे जिन्नसांचा बडा व्यापारी.

**न्यायाधीश**–

**चिटणीस**–

**बेलीफ**–

**सोन्या**–तात्यासाहेबांचा विश्वासू नोकर.

**मन्या**–आण्णासाहेबांचा नोकर.

**काळ्या** }
**बड्या** } मारेकरी.

( हुजरे शिपाई वगैरे इतर पात्रें. )

# कथानकाचा अंकवार गोषवारा.

## अंक १ ला.

तात्यासाहेब व आण्णासाहेब यांचा सावकारीसंबंधीं व्यवहार; विश्वासराव व कृष्णराव यांचें मित्रत्व व धंद्या संबंधीं विचार.

## अंक २ रा.

कृष्णरावाचें कृष्ण कारस्थान; विश्वासरावास तात्यासाहेब व शास्त्रीबोवा यांचा उपदेश.

## अंक ३ रा.

कृष्णरावाची उच्च स्थिति व त्याचा सुशिलेशीं विवाह लावण्याचा यत्न.

## अंक ४ था.

विश्वासरावास सुशिलेची प्राप्ति; कृष्णराव विश्वासरावास मारेकरी घालतो; विश्वासराव कृष्णरावा पासून खातें पाडून घेतो व मारेकऱ्यां कडून चाकरी खतें लिहून घेतो.

## अंक ५ वा.

कृष्णरावावर विश्वासरावाची फिर्याद; निवाड्याच्या बजावणीनें कृष्णरावाच्या इस्टेटीची वाताहात होऊन त्यास अन्नपाण्याची मोताद पडते व तो विश्वासरावाचे पदरीं राहतो; कृष्णरावाचा पश्चात्ताप व आत्मघात करण्याचा बेत.

# योग्य शासन नाटक.

## प्रवेश सूचिका.

### अंक १ ला.

प्रवेश १ ला.

पात्रें—तात्यासाहेब, आण्णासाहेब, सदोबा व सोन्या.

प्रवेश २ रा.

,,—विश्वासराव व कृष्णराव.

प्रवेश ३ रा.

,,—तात्यासाहेब व विश्वासराव.

प्रवेश ४ था.

,,—विश्वासराव, कृष्णराव व मन्या.

प्रवेश ५ वा.

,,—विश्वासराव, कृष्णराव व गणपतराव.

प्रवेश ६ वा.

,,—विश्वासराव व कृष्णराव.

# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

पात्रें-विश्वासराव,सुशिला, जनूभट व कृष्णराव.

## प्रवेश २ रा.

,,-कृष्णराव, सुशिला व मन्या.

## प्रवेश ३ रा.

,,-तात्यासाहेब व शास्त्रीबोवा.

## प्रवेश ४ था.

,,-सुशिला, कृष्णराव व मन्या.

## प्रवेश ५ वा.

,,-विश्वासराव व शास्त्रीबोवा.

## प्रवेश ६ वा.

,,-विश्वासराव, कृष्णराव व मन्या.

---

# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला.

,,-कृष्णराव.

## प्रवेश २ रा.

,,-सुशिला व मन्या.

प्रवेश ३ रा.

–सोन्या व मन्या.

प्रवेश ४ था.

–सुशिला व कृष्णराव.

---

## अंक ४ था.

प्रवेश १ ला.

–विश्वासराव व सोन्या.

प्रवेश २ रा.

–विश्वासराव व जनूभट.

प्रवेश ३ रा.

–सोन्या व मन्या.

प्रवेश ४ था.

–विश्वासराव, सुशिला व सोन्या.

प्रवेश ५ वा.

–कृष्णराव, मन्या व मारेकरी.

प्रवेश ६ वा.

–सोन्या व मन्या.

प्रवेश ७ वा.

,,–शास्त्रीबोवा व सोन्या.

प्रवेश ८ वा.

,,–विश्वासराव, शास्त्रीबोवा, कृष्णराव,. सदोबा, सोन्या, मन्या, मारेकरी व इतर नोकर.

---

## अंक ५ वा.

प्रवेश १ ला.

,,- कृष्णराव व सोन्या.

प्रवेश २ रा.

,,–तात्यासाहेब, विश्वाराव व शास्त्रीबोवा.

प्रवेश ३ रा.

,,–विश्वासराव, सदोबा व सोन्या.

प्रवेश ४ था.

,,–कृष्णराव व सदोबा.

प्रवेश ५ वा.

,,–न्यायाधीश, चिटणीस, विश्वासराव, कृष्णराव, सदोबा व शिपाई.

प्रवेश ६ वा.

,,–सदोबा, बेलीफ, कृष्णराव, मन्या व शिपाई.

प्रवेश ७ वा.

,,–विश्वासराव, सुशिला, कृष्णराव, सोन्या व मन्या.

प्रवेश ८ वा.

,,–विश्वासराव, सुशिला, कृष्णराव व मन्या.

प्रवेश ९ वा.

,,–विश्वासराव, कृष्णराव व सोन्या.

---

# योग्य शासन नाटक.

## अंक १ ला.

### प्रवेश १ ला.

पात्रें—तात्यासाहेब, आण्णासाहेब, सदोबा व सोन्या.

स्थळ.—तात्यासाहेबांचा दिवाणखाना.

तात्या०—( खातेवही पाहून ) सदोबा, त्या मोतीराम जवाहिऱ्यानं अझून पैसे आणून नाहीं दिले? बः चैत्र, वैशाख, ज्येष्ठ, आषाढ, श्रावण, भाद्रपद ( बोटांनी मोजून ) सहा महिने झाले. पैसे परत देण्याची मुदत किती होती पहा पाहूं.

सदोबा.—( कीर्द पाहून ) आषाढ महिना अखेर होती.

तात्या०—मग; त्याला तगादा नाहीं केलात? तुमच्या हाताशीं हुजऱ्ये होतेना? इतका मनुष्याच्या अंगांत आळस उपयोगीं नाहीं. ह्या आळसानें किती जणांना तरी नागवून सोडलं आहे. धन्याची नोकरी इमानें इतबारें व काळजी पूर्वक करणं हें चाकराचं मुख्य कर्तव्य आहे. आणि ह्या कर्तव्यास तुह्मी जर झुगाराल तर खचित सांगतों कधींहि तुमचं हित होणार नाहीं. पगार थोडा ह्मणून काम करण्यास आळस करीत

असाल तर पुढच्या महिन्या पासून तुह्माला पसतीस रुपये पगार केला आहे. आतां मात्र तुमच्या कडून कोणत्याहि कामाची मुळींच हयगय होतां उपयोगी नाहीं. मला सुद्धां वाटत होतंच कीं, मी जे तुह्माला वीस रुपये देतों ते फार कमी आहेत. कर्तव्यांत व्यत्यय न आणतां मज जवळ पगारा बद्दल गोष्ट काढतेत तर मी नाहीं ह्मटलं नसतं ह्या वेळीं माझ्या डोक्यांत हीं कल्पना सहज आली हें एका प्रकारें ठीक झालं. बरं; तर मग मोतीरामाकडे सोन्याला चांगला तगादा करायला सांगा.

( इतक्यांत सोन्या येतो. )

**सोन्या**-( प्रवेश व राम राम करून ) धनी सायेब भाईर आन्नासायेब आल्याती.

**तात्या०**- कोण, आण्णासाहेब ? जा, जा; त्यांना आंत येऊं दे.

**सोन्या**-जी, व्हय धनी सायेब. ( राम राम करून जातो. )

( आण्णासाहेब येतात. )

**तात्या०**-( आण्णासाहेबांस पाहून ) यावं आण्णासाहेब, नमस्कार, नमस्कार.

**आण्णा०**-नमस्कार तात्यासाहेब. स्वारींची तबियत कशी काय आहे; ठीक आहेना ?

**तात्या०**-होय. जगदीश कृपेनें ठीक आहे. बरं, पण फार दिवसांनीं आपण इकडे कुठे वाट चुकलांत ?

आण्णा०–कां बरं तात्यासाहेब, मी येत का नाहीं आपल्याकडे ?

तात्या०–अहो येतां; पण तुमचं काम असलं तर येतां. खरं ना ? बरं, आपलं काय काम आहे ?

आण्णा०–( तात्यांस एकीकडे ) हें पहा मला तुमच्या जवळ एक नाजूक गोष्ट बोलायची आहे. तेव्हां, येथें सदोबा नसतील तर मला मन मोकळेपणें तुमचे जवळ बोलायला सांपडेल.

तात्या०–बरं ( सदोबांस ) सदोबा, सोन्या अझून कसा येत नाहीं. आश्चर्य आहे मोठं; तो पैसे देत नाहीं वाटतं ! तुह्मी स्वतःजा आणि ताबडतोब पैसे वसूल करा. ह्या गुलामांना ह्यांच्या पतीवर व ह्यांच्या गोड बोलण्यास भुलून पैसे द्यावेत, आणि घेते वेळीं अशा पंचाईती करीत बसावं. आज देतों आणि उद्यां देतों. पुन्हां व्याज देखील फार नाहीं फक्त बारा आणे. ठीक आहे ह्मणावं; आतां पुन्हां माझी पायंडी तर चढा; ह्या पुढें आपली पतच उरली नाहीं. मी साफ पैसे देणार नाहीं; मग पाहतों कोणाकडे मिळतात तें. सदोबा, तुह्मी अझून उभेच ? जा; लवकर जा.

सदोबा–जातों महाराज. ( जातो. )

तात्या०–आण्णासाहेब, आतां खुशाल बोला. सदोबा कामाला गेले आहेत ते येवढ्यांत येणार नाहींत.

आण्णा०-बोलायचं काय तात्यासाहेब, कर्माच्या रडकथा गात बसायचं झालं ! अहो त्या रघुनाथरावावर तीन हजारांचा निवाडा झाला, पण बजावणीच्या वेळेस हातांत कांहींच आलं नाहीं; तसंच ह्या शेतकऱ्यांकडे किती तरी पैसे बुडताहेत ह्मणून सांगूं, त्याची कांहीं गणतीच नाहीं. त्यांच्या जवळ पैसे मागितले कीं, " काय करावं आंवदूं दुकाळ हाय ना ? " अशा ह्यांच्या नेहमीं रडकथा चालायच्या. आतां, ह्याला उपाय तरी काय करावा तात्यासाहेब ? अझून तुमचं गुदस्तांचं थोडं व यंदांचं सगळं व्याज द्यायचं पडलं आहे. मी तरी काय करूं. बरं, आतां मी इतकंच ह्मणतों कीं, एकोत्रा आहे तो बारा आणे करा; आणि मला त्याच दरानं आणखी दहा हजार रुपये द्या दुसरं काय ?

तात्या०-तुह्मी गुदस्तांच्या व्याजाचा तर निकाल करा अगोदर.

( इतक्यांत सदोबा येतो. )

तात्या०-कां सदोबा, वसूल केलात कीं नाहीं ?

सदोबा-होय महाराज; अगदीं सव्याज रकम वसूल केली आहे.

तात्या०-ठीक झालं; आण्णासाहेबांचा हिशेब काढा पाहूं.

सदोबा-होय महाराज; ( हिशेब काढून ) गुदस्तांचे

व्याजा पैकीं तीन हजार रुपये ह्यांचे कडे राहिले आहेत, आणि यंदा सराईला नेलेली रक्कम व व्याज मिळून एकंदर दीडलाख रुपयांची रक्कम आण्णासाहेबां-कडून अद्याप यावयाची आहे.

**आण्णा**–किती किती, गुदस्तांचं व्याज किती ह्मणालेत सदोबा ? तीन हजार रुपये, माझ्या हिशेबानं इतके नसावेत.

**सदोबा**–गुदस्तां तुमचे कडून एकंदर पंचवीस हजार रुपये व्याज यायचं, त्यांत तुह्मी कार्तिक शुद्ध प्रतिपदेला पंधरा हजार रुपये दिलेत, व मार्गशीर्ष शुद्ध पंचमीला सात हजार रुपये दिलेत त्यावर तुमचे कडून कांहींच आलं नाहीं.

**आण्णा०**– हं. ही घ्या आपली व्याजाची रक्कम. ( असें ह्मणून रुपये मोजून तात्यासाहेबांचे पुढें ठेवतो. )

**तात्या०**– किती, तीन हजार आहेत का ? ( सदोबांस ) सदोबा, आण्णासाहेबांचे खात्याला हे जमा करा. ( आण्णासाहेबांस ) हें पहा आण्णासाहेब, व्यवहार ह्मटला ह्मणजे त्यांत कोणाचीही भीड धरतां उपयोगीं नाहीं. भीड धरली कीं तिनें मान दाबलीच समजा; ह्मणून ह्मणतों कीं, मी कालपासून असा निश्चय केला आहे, कोणीहि कूळ असो त्याच्या पासून खातें पाडून घेतल्या शिवाय त्याला कर्जाऊ रक्कम अशी द्यायचीच

नाहीं. आह्मीं ह्या भिडेनें आजपर्यंत बरेच गोत्यांत आलों आहों. त्या मोतीरामला पंधरा हजार रुपये त्याच्या नुसत्या तोंडाकडे पाहून एकोत्रा व्याजानं दिले होते, ते तो देतों देतों असं करून आज पंधरा दिवस होऊन गेले; मग आमचा जेव्हां त्याच्याकडे अगदीं तगादाच लागला, तेव्हां त्यानें ते दिलेन. हे जर तो देता ना तर फुकट येवढी पंधरा हजारांची रकम पाण्यांत पडली होती ना ? कारण, आपल्या जवळ त्याची चिठी ना चपाटी करतां काय; तेंव्हां तुह्मांला मी स्वच्छ सांगतों कीं, तुह्मीं खातं पाडून देऊन वाटेल तेवढी रक्कम न्या, माझी हरकत नाहीं. अहो, नुसतं तोंडाकडे पाहून पैसे देण्याचा काळ आतां उरला नाहीं. त्राण तरी कोणाच्यांत उरला आहे; सगळा देश उजाड होण्याची वेळ आली आहे. कारण, ह्या दुष्काळामुळें दया तरी कोणावर करावी ? जो येतो तो ह्मणतो तात्या सूट द्या.' आतां ह्यानां सूट द्यायची कोठून ? गेला तो दिवस आपला, असं ह्मणून स्वस्थ रहावं झालं; पुढें काय व्हायचं असेल तें होईल.

आण्णा० - तात्यासाहेब, तुमच्या व माझ्या व्यवहाराला आज जवळ जवळ तीस वर्षें होऊन गेलीं आणि आत्तांच माझ्याबद्दल असा संशय कां येतो ?

तात्या०-अहो असं पहा, काळ फिरला; कलियुग सुरू झालं; आतां भल्याची दुनिया राहिली नाहीं; तशांत

आपले वडील चिरंजीव कृष्णराव जरा लफंगिरी करूं लागले आहेत, अशी गांवांत गुण गुण आहे. तेव्हां आतां पासूनच असा चोख व्यवहार ठेवला ह्मणजे झालं; मग मागाहून फिकीर करायला नको. आण्णा-साहेब, मी आपल्या जवळ स्पष्ट बोललों ह्या बद्दल रागाऊं मात्र नका.

**आण्णा०**–छेः छेः रागावायचं काय कारण आहे. पण व्याज काय घेणार ?

**तात्या०**–तुमच्या ह्मणण्या प्रमाणें बारा आणेच.

**आण्णा०**–ठीक आहे; तर मला आतां दहा हजार रुपये द्या ह्मणजे झालं.

**तात्या०**–हं. हे घ्या; ( खिशांतून नोटा काढून देऊन ) पुन्हां एकदां मोजा; पैशाचं काम आहे तें

**आण्णा०**–( पैसे मोजून ) आहेत अगदीं बरोबर आहेत.

**तात्या०**–( सदोबांस ) सदोबा, त्यांनां एक कोरं पान देऊन पावतीचं तिकीट काढून ठेवा.

( आण्णासाहेब खातें लिहून तिकीट मारून सही करतात. )

**तात्या०**–( खातें हातांत घेऊन ) हं, ठीक आहे. जा आतां तुह्मी; पण आण्णासाहेब ती आधींची रक्कम लवकरच पोंचती करा हो ?

( इतक्यांत सोन्या येतो. )

**सोन्या०**–( प्रवेश व रामराम करून ) घरामंदी ज्येवनाचा वखत झालाया धनी सायेब.

**तात्या०**–( सदोबांस ) सदोबा, रुमाल बांधा. आतांची रक्कम आण्णासाहेबांच्या नांवावर लिहिलीत ना ?

**सदोबा**–होय, लिहिली.

**तात्या०**–बरं तर, मी आतां स्नानाला जातों. ( जातो. )

( पडदा पडतो. )

## प्रवेश २ रा.

**पात्रें**–विश्वासराव व कृष्णराव.

**स्थळ**–विश्वासरावांचा खाजगी दिवाणखाना.

( विश्वासराव दिवाणखान्यांत बसले असतां पडदा उघडतो. )

**विश्वास०**–( आपल्याशीं ) काय चमत्कार आहे पहा मी सहा महिन्यांचा असतांच माझी मातोश्री वारल्यामुळें बाबांचं मजवर किती तरी प्रेम आहे; तशांत मी त्यांचा एकुलता एक मुलगा, मग माझ्या शिवाय ह्मातार पणीं त्यांनां दुसरा आधार तो कोणाचा ? परवां मला घोड्यावर बसावंसं वाटतं ह्मणून बोललें मात्र, तों लागलाच त्यांनीं हजार रुपये किंमतीचा घोडा आणून बांधला; व एक शिकवणारा ठेऊन मला घोड्यावर बसण्याच्या कलेंत अगदीं प्रवीण करून सोडलं. मी कृष्णरावाच्या पाठीस किती तरी दिवस लागलों आहे कीं, तूं सुद्धां आपल्या वडलांनां

सांगून एक नवीन घोडा घे. पण त्याचा बाप कसला खमंग, तो का त्याला घोडा घेऊन देणार ? एक पै खर्चायची ह्मणजे त्याचा जीव खालीं वर होतो. बाकी त्याच्याकडे कांहीं दोष नाहीं. तो कितीकांच्या तरी हौशी पुरवणार ! वर्षास दोन चार कारणं करतां करतां त्याचा जीव अगदीं मध्व्यास येतो. आमच्या बाबांचं काय, माझ्या शिवाय दुसरं पोर ना बाळ. काय ते आह्मीच एकटे खुंट. बरं असो. आताशें चार पांच दिवसांत कृष्णराव इकडे मुळींच आला नाहीं; कोणच्या कामांत येवढा गढला आहे नकळे.

( इतक्यांत सोन्या येतो. )

**सोन्या**–( प्रवेश व रामराम करून ) धनी सायेब त्ये आपल आन्नासायबांच ल्योक आल्याती.

**विश्वास०**–कोण, कृष्णराव ? अरे वेडगळा त्यांनां आंत लाऊन द्यायचं तुला समजत नाहीं ? त्यांनां माझ्या इथें येण्याला परवानगी कशाला पाहिजे. खबरदार; आज-पासून कृष्णरावाला जर अटकाव झाला तर तुझी बत्तीशी हालवून टाकीन. जा जा त्यांनां येऊंदे आंत. अजागळ कुठला.

**सोन्या**–जी धनी सायेब ( मुजरा करून जातो. )

( कृष्णराव येतो )

**विश्वास०**–( कृष्णरावास पाहून ) या, कृष्णराव बसा. ( कृष्णराव बसल्यावर ) कृष्णराव, अगदीं घामाघूमसे

दिसलां ? घोडा फिरायला काढला होता वाटतं किती किंमतीचं पाठाळ खरेदी केलं आहे, तुह्मी काय बडे-लोक बोवा. दीड दोन हजारां पर्यंत सहज असेल. येवढा सट्टा तरी कोठें जमवलात ? मला अगदीं कळवलं सुद्धां नाहीं.

**कृष्ण०**–( खजील होऊन ) विश्वासराव, मला गरीबाला हे असले शालजोडींतले देऊन उगीच दुःख कशाला देतां?

**विश्वास०**–तुह्मांला राग आला वाटतं ? मी आपला सहज बोललों.

**कृष्ण०**–( एकीकडे ) मांजराचा खेळ होतो, पण उंदराचा जीव जातो.( उघड ) विश्वासराव, आपण बोललांत सहजच पण मला तें लागलं.

**विश्वास०** तुह्मांला बोलणं लागावं ह्या हेतूनं मी मुळींच बोललों नाहीं.

**कृष्ण०**–नाहीं तर काय ? तुह्मी असा विचार करा, मला घोडा मिळणं मुळींच शक्य नाहीं, आणि तुह्मी ह्मणतां दीड दोन हजारांचं पाठाळ असेल ! याचा अर्थ तरी काय ? काय ह्मणे सवदा कोठें जमवलात. अहो, सवदा जमवते वेळीं तुह्मांला नाहीं का कळवणार ?

**विश्वास०**–( हंसून ) काय हो कृष्णराव, तुह्मी तरी मोठी गंमत करतां. तुह्मांला काय घोडा मिळणं मुळींच शक्य नाहीं ? अहो तुह्मी असे गल्ली कुचींतले नाहीं आहांत. चांगले सावकार पुत्र आहांत.

**कृष्ण**०—त्या आमच्या रडक्या सावकारकीचं कशाला काढतां हो; अहो, ती सगळी तुमच्च्याच जिवावर. यंदांचं व्याज व रक्कम द्यायची अझून रखडली आहे; आणि कसले आह्मी सावकार पुत्र!

**विश्वास**०—कोळसा उगाळावा तितका काळाच. बरं, पण आण्णांजवळ घोड्याची गोष्ट काढली होतीत का?

**कृष्ण**०—काढली होती; पण—

**विश्वास**०—पण काय, आण्णांनीं रुकार नाहीं दिला?

**कृष्ण** —छे हो; ते कसले रुकार देतात; ते ह्मणाले 'हरीची मुंज व साळूचं लग्न हीं दोन कारणं यंदांच करावीं लागलीं त्यामुळें पैशाची फार ओढ आहे!' विश्वासराव, माझ्या गृहस्थिति बद्दल जेवढं सांगावं तेवढं थोडंच आहे. मी एखादा हट्ट घेतला, आणि तो ह्मणजे आमच्या आण्णांनीं पुरवला असा एकहि दिवस नाहीं. कधीं किरकोळ खर्चाला पैसे मागीतले तरी सुद्धां त्यांची कांहींना कांहीं सबब आहेच. खरोखर मला आताशें असा वीट आला आहे कीं, त्या घरकडे नुसतं पाहूं सुद्धां नये. ज्या घरांत दुसऱ्याच्याच ओंजळीनं पाणी पिऊन राहण्याची वेळ येते, अशा घरांतील वास सुखद कसा व्हावा? विश्वासराव तुह्मांला जर माझी कांहीं दया येत असेल तर पहा. माझ्या मनांत कांहीं तरी एखादा धंदा काढावा असं येतं पण मुदलांत मुरकुंडी.

आमच्या गरिबाची तुह्मांला दया आली तर उपयोग. आह्मां भुकेबंगालांनां भांडवल तरी कोण देतो?

**विश्वास**०–कृष्णराव, ज्यापेक्षां तुझं आणि माझं अगदीं लहानपणा पासून मित्रत्व आहे, त्यापेक्षां अशा वेळीं तुला मदत करणं हें माझं कर्तव्यच आहे असं मी समजतों. आतां तूं अगदीं बेफिकीर ऐस. होईल तितकी खटपट मी करतों आणि लागेल तेवढं तुला भांडवल देतों.

**कृष्ण**०–( एकीकडे ) खरोखर आजकाल ह्या जगावर मित्रा सारखा पाठीराखा दुसरा कोणीही नाहीं. विश्वासरावाचा किती तरी उदारपणा हा? ( उघड ) विश्वासराव, तुझें मजवर पाठच्या भावा प्रमाणें प्रेम आहे यांत संशय नाहीं. बरं तर; मी आतां जातों. त्या उद्योगाला मात्र लवकरच लाग. बाकी तुला सांगायला नकोच. माझ्यापेक्षां तुला जास्त काळजी आहे हें मी समजतों. ( जातो. )

**विश्वास**०–( कृष्णराव गेलासें पाहून ) मित्राचं प्रेम फार कठीण आहे त्याची ही स्थिति ऐकून माझ्या अंतःकरणाचे अगदीं तुकडे तुकडे होऊन गेले. आतां त्याच्या उद्योगाला लागावं हें बरं. मी त्याला लागेल तेवढं भांडवल देण्याचं कबूल केलं आहे तेव्हां ही गोष्ट बाबांजवळ काढल्या शिवाय गत्यंतरच नाहीं तेव्हां बाबांकडेच जावं. ( जातो. )

( पडदा पडतो. )

## प्रवेश ३ रा.

पात्रें—तात्यासाहेब व विश्वासराव.

स्थळ—तात्यासाहेबांचा दिवाणखाना.

( तात्यासाहेब व विश्वासराव बसले असतां पडदा उघडतो. )

**विश्वास०**—बाबा, मी तुमच्याशीं एक गोष्ट काढणार आहें, पण तुह्मी रागावणार नाहीं ना ?

**तात्या०** -विश्वासा, खुशाल बोल; मनांत धास्ती ठेऊं नकोस.

**विश्वास०**—बाबा, आण्णासाहेब बरेच श्रीमंत आहेत काय हो ?

**तात्या०** छेः कसले श्रीमंत ते ! कसा तरी आज पोटा पुरता धंदा करताहेत ह्मणून लोक श्रीमंत ह्मणतात झालं दुसरं काय ?

**विश्वास०**—बाबा, तुह्मी असं कसं ह्मणतां ? त्यांचा सावकारीचा धंदा एवढा शहर भर जो माजला आहे तो फुकट ?

**तात्या०**—विश्वासा, तूं अझून लहान आहेस. पोटासाठीं दगडावर दगड घालून खटपट करावी लागते.

**विश्वास०**—पण तुह्मी कांहीं ह्मणा बाबा, त्यांच्याजवळ बराच पैसा असावा असा माझा अंदाज आहे.

**तात्या०**—छे छेः तुला हा सगळा भ्रम आहे. त्याचा जो हा येवढा व्यापार दिसतो आहे तो सगळा आपल्या-वरच अवलंबून आहे. आपल्या कडून एकोत्रा नाहीं तर

बारा आण्यांनीं रकमा न्यायच्या आणि त्या दुहोत्रा किंवा अडचोत्रा व्याजानं दुसऱ्याकडे लावायच्या. ह्या व्याजांत जो फरक तोच त्यांचा फायदा. आणि त्यावरच सगळ्या कुटुंबाचं पोषण करायचं.

विश्वास०–मग बाबा, येवढ्याशा फायद्यावर त्यांचा एवढा इतमाम कसा चालावा ?

तात्या०–असं बघ, व्यापार किंवा धंदा सतत बरींच वर्षं चालला ह्मणजे व्याजाचं व्याज असं करतां करतां मूळ रकमेंत बरीचशी भर पडते; व अशानें व्यापार बराच सरसावतो. ह्या आण्णासाहेबाला हा धंदा करूं लागल्याला आज कमींत कमी तरी चाळीस वर्षं झालीं असतील. फार लांब कशाला त्याचा आणि माझा आज तीस वर्षं देवघेवीचा व्यवहार चालला आहे.

विश्वास०–बाबा, आण्णासाहेब तरी नेकीचे सावकार दिसतात; ह्मणून तुमचा आणि त्यांचा अखंड व्यवहार चालला आहे.

तात्या०–तो इतर लोकां जवळ फार लबाडीनं वागतो, असा लोकांत गवगवा आहे. फक्त माझ्या जवळ मात्र त्यानं अजून लबाडी कशी ती केली नाहीं. पण आताशें मी त्याच्याजवळ पूर्वींपेक्षां निराळ्या रीतीनें व्यवहार ठेविला आहे.

विश्वास०–मला सांगाना ?

**तात्या०**–पूर्वी त्यांनां जी रक्कम लागे ती मी नुसती त्यांच्या पतिवर देत असें. पण आतां मात्र त्यांचं खातं पाडून घेतल्या शिवाय रक्कम देत नाहीं.

**विश्वास०**–बाबा, तुह्मी त्यांच्यावर इतके कां रागावलांत ?

**तात्या०**–रागावलों नाहीं, पण मनांत अशी शंका यायला लागली आहे कीं, आण्णासाहेबांचं झालं आहे उतार-वय पिकल्या पानाचा काय भरंवसा पट्कन् जातील मरून आणि त्यांच्या मुलांशीं यायचा संबंध. अशा वेळीं आपल्याजवळ लेख नसेल तर आपले पैसे येण्याला मुळींच मार्ग राहणार नाहीं. ह्मणून असा बेत केला आहे. त्यांतून त्याचा मुलगा कृष्णराव जरा लफंगा आहे असं ऐकतों.

**विश्वास०**–बाबा, तें असूं द्या. मी आतां मोठा झालों, मला सर्व कळत आहे. मला एखादा व्यापार करण्याची फार इच्छा झाली आहे.

**तात्या०**–तुला कशाला व्यापार करायला पाहिजे ? मी जो हा सावकारकीचा धंदा करतों आहें तो तुझाच आहे. आणखी निराळा व्यापार करून माझ्या पाठीमागें तुला फार जड जाईल. तुझ्यानें जसे पाहिजेत तसे श्रम होणार नाहींत. श्रम कसे करावेत हें तुला ठाऊक देखील नाहीं. तशांत तुला पाठबळ मुळींच नाहीं. तेव्हां तूं माझाच धंदा चालव मी उद्यां ह्या धंद्याची सर्व माहिती तुला करून देईन. भलताच आग्रह धरूं नकोस.

**विश्वास**०—बाबा, पण सावकारी शिवाय मला दुसरा धंदा करावासा वाटतो.

**तात्या**०—तूं तरी एक हट्टी मुलगा आहेस. एकदां जो एक नाद घेशील तो पुरा करशील. बरं बोवा कर; माझ्यानें तुला नाहीं ह्मणववत नाहीं.

**विश्वास**०—जें भांडवल लागेल तें द्याल ना? नाहीं तर धंदा कर ह्मणून माझी कोरडी समजूत कराल.

**तात्या**०—नाहीं बरं. तुझ्या मनांत ज्यापेक्षां आलं आहे, त्या पेक्षां एकदां त्याचा अनुभव येऊं दे तुला जें काय भांडवल लागेल तें मी देईन. पण ह्या धंद्यांत तूं मदत कोणाची घेणार आहेस?

**विश्वास**०—बाबा, त्याची काळजी तुह्मांला मुळींच नको. माझा जिवश्च कंठश्च मित्र कृष्णराव आहे ना? त्याला मी तर आपला धाकटा भाऊच समजतों.

**तात्या**०—मी आतांच तुला सांगितलं ना, कृष्णराव जरा लफंगा झाल्याचं माझ्या कानावर आलं आहे ह्मणून? आणि तूं तर ह्मणतोस मा त्याचीच मदत घेणार. अरे तूं असा वेडांत शिरूं नकोस. ह्या धंद्याच्या कामांत कोणी कोणाचा विश्वास धरूं नये. प्रत्यक्ष बापास सुद्धां मुलावर पूर्ण विश्वास ठेवितां येत नाहीं. मग इतरांची ती गोष्ट कशाला. हा पैसा स्नेह जोडतो व स्नेह तोडण्यास देखील कारण होतो. हें सगळं वेड तुझ्या मनांत

बहुतकरून त्या कृष्णरावानेंच भरून दिलं असेल. कारण, त्याचा बाप त्याला खर्चायला एक पैसा सुद्धां देत नसेल; तेव्हां तुझ्या सारख्याला बगलेंत मारून आपला तळीराम गार करून घेण्याची त्यानं तोड काढली आहे दुसरं काय. मी तुला खरंच सांगतों, तूं ह्याच्या नादीं लागूं नकोस. ह्याचा तुला पश्चाताप झाल्याशिवाय कधीं राहणार नाहीं. जगावर कशा तऱ्हेचे लोक आहेत ह्याचा तुला अझून मुळींच अनुभव नाहीं. मला माझ्या हयातींत असले पुष्कळ अनुभव आले आहेत. हे लोक दुसऱ्यास आपल्या ताब्यांत घेण्यास पाहिजे तेवढे श्रम करतात आणि एकदां तो पूर्णपणें ताब्यांत आला व त्यांचा पैशाशीं संबंध पोंहोंचला ह्मणजे ते आपलीं नखं हळु-हळु दाखवायला लागतात; शेवटीं ज्याच्यावर ते अवलंबून असतात त्यास विचारीनासे होतात; आणि आपली उत्तम रीतीनें चंगळ करून घेऊन आपल्या आश्रय दात्याचे उपकार मुळींच स्मरत नाहींत. इतकंच नव्हे, तर तो जगांत राहिल्यानें आपल्याला थोडीशी नामोशी आहे असं समजून त्याचा प्राणनाश देखील करतात. तेव्हां विश्वासा तूं ह्या कृष्णरावाच्या मात्र नादीं लागूं नकोस. तूं अगदीं साधाभोळा आहेस आणि तो कृष्णराव एव्हां पासूनच लफंगिरी करूं लागला आहे. तो तुला खरोखर फसवील. वळणाचं पाणी वळणाला गेल्या शिवाय

कधींहि राह्यचं नाहीं. ह्याबद्दल तुला जेवढं सांगावं तेवढं थोडंच. पहा, विचार कर. मला ह्या पेक्षां जास्त बोलववत नाहीं.

**विश्वास**०–मला तीन लाख रुपये द्या.

**तात्या**०–मी येवढं बोललों त्यांतलं कांहींच तुझ्या मनास आलं नाहीं ना ? ( एकीकडे ) मुलगा पहिल्या पासूनच हट्टी. एकुलता एक पडला, तेव्हां जास्त कमी दरडाऊन बोलेन तर त्याला अतिशय वाईट वाटेल. तें मग माझ्यानें पाहववणार नाहीं. ( उघड ) काय, तुला तीन लाख रुपये पाहिजेत ? ( खिशांतून नोटा काढून देऊन ) हे घे. आतां यांचा चांगल्या रीतीनें व्यय कर येवढंच माझं तुला सांगणं आहे. ( एकीकडे ) अलीकडलीं मुलं स्वतःच्याच मतानं वागायचीं तीं आमचं ह्यातार्‍या कोतार्‍यांचं कसलीं ऐकणार. छेः त्यांना जेव्हां पक्की ठेंच लागेल तेव्हां मात्र ह्यातार्‍यांची आठवण व्हायची. माझं एकच पोर, त्याच्या साठीं तीन लाख रुपयांचा चुना झाला तरी मला त्याचं दुःख नाहीं. पण त्या कृष्णरावानें ह्याला एखाद्या फंदांत घातलं नाहीं ह्मणजे मिळवलं. ( उघड ) विश्वासा, आतां मी संध्यावंदन करण्यास जातों.

( जातो. )

**विश्वास**०–( तात्या गेल्यावर आपल्याशीं ) कशी तरी एकदां मोठी कामगिरी पार पडली. बाबांना कृष्णरावा

बद्दल संशय आहे पण आह्मी तर एकमेकांवर भावा प्रमाणें प्रीति करतों. आमचे दोघांचे विचार देखील अगदीं एक. असं असून कृष्णराव माझ्याशीं दगलबाजी करील ? छेः मुळींच नाहीं. आतां जेवण आटपल्यावर कृष्णरावाकडेच जावं. ( जातो. )

( पडदा पडतो. )

## प्रवेश ४ था.

पात्रें- विश्वासराव कृष्णराव व मन्या.

स्थळ—कृष्णरावाची खोली.

( कृष्णराव बसला असतां पडदा उघडतो )

**कृष्ण**०—( आपल्याशीं ) विश्वासरावाचं मजवर केवढं हें प्रेम ! मी त्याच्याजवळ गोष्ट काढायचीं खोटी तोंच त्यानं भांडवल द्यायचं कबूल केलन, धन्य आहे त्याची ! ह्या विश्वासरावा जवळ कांहीं गुप्त पैसा आहे कीं काय ? ( जरा विचार करून ) छेः अशी लुच्चे-गिरी करणारा तो मनुष्य नाहीं. तो जें ह्मणेल तें जर त्याचा बाप ऐकतो, तर त्याला लुच्चेगिरी तरी कशाला करायला पाहिजे. आमच्या आण्णांजवळ मात्र अशी लुच्चेगिरी केल्याशिवाय चालत नाहीं. त्यांच्या जवळ कांहींच बोलण्याची सोय नाहीं. मी राघवदासाला खातं पाडून देऊन त्याच्या कडून पांचशें रुपये

आणले, हें आमच्या आण्णांनां कळल्या बरोबर ते मला अगदीं खायला आले. ही गोष्ट त्यांनीं सगळ्या गांवभर केली असेल यांत शंकाच नाहीं; आणि ही हकीगत जर का तात्यासाहेबांनां कळली असली, आणि विश्वासरावानं त्यांच्या जवळ माझ्या संबंधीं गोष्ट काढली असली तर मोठी पंचाईत आहे. काय करावं, विश्वासराव भांडवल देतों ह्मणाल्यापासून माझं सगळं लक्ष तिकडेच लागून राहिलं आहे. मला विश्वासरावाजवळ होतां होईल तितकं करून अगदीं नेकीनं राहिलं पाहिजे. कारण, माझा अन्नदाता तरी तोच असं ह्मणायला कांहीं हरकत नाहीं . आणि त्याच्याशीं जर मी बेइमान झालों तर लोक माझ्या तोंडावर अलबत थुंकतील.

( इतक्यांत मन्या येतो. )

मन्या– ( प्रवेश व रामराम करून ) धाकटं ह्माराज, इसवासराव भाईर हाका मारत्यात.

कृष्ण०– काय, विश्वासराव आले आहेत ? आणि माझ्याकडे ? मन्या, त्यांचा घोडा धरून उभा रहा जा. मी हा आलोंच.

मन्या–व्हय ह्माराज ( राम राम करून जातो. )

कृष्ण०– ( मन्या गेल्यावर ) काय बैठकीवर केर पडलेला आहे हा. ह्या चाकरांनां जेवढं सांगावं तेवढंच कामं

करतात. आज बैठक झाड ह्मणून सांगायला विसरलों; मग चाकर तरी कशाला झाडतो आहे. त्यांच्या पाठीवर राहून काम करून घेतलं पाहिजे. ( बैठक स्वतः झटकून विश्वासरावाच्या सामोरा जातो. )

( कृष्णराव व विश्वासराव प्रवेश करितात. )

**कृष्ण०**—या, विश्वासराव असे बसा. आपलंच घर आहे. संकोचाचं कांहीं कारण नाहीं.

**विश्वा०**—कृष्णराव, मला तुझेकडे मुळींच संकोच वाटत नाहीं. कारण, आपण लहानपणीं ह्या घरांत पाहिजे तसे नाचलों बागडलों आहों ना ?

**कृष्ण०**—काय, मग परवांचं काय झालं ?

**विश्वास०**—( थट्टेनें ) छे बोवा; अझून कांहीं जुळलं नाहीं.

**कृष्ण०**—मी ह्मटलं तुह्मी जें एकदां बोललांत तें खरं करालच; आणि हें असं कसं झालं ?

**विश्वास०**—तें जुळेलरे त्याची कांहीं येवढी पंचाईत नाहीं. मग, कोणता धंदा करायचा ?

**कृष्ण०**—( धीर येऊन आनंदानें ) मला वाटतं, इंग्लंडांतला माल इकडे आणावा आणि इकडचा तिकडे न्यावा.

**विश्वास०**—छेः मला नाहीं पसंत. ह्या धंद्यांत दगदग भारी पडणार आहे. शिवाय हा धंदा करायचा ह्मटला ह्मणजे आपल्याला पहिल्या प्रतिचं इंग्रजी लिहितां

वाचतां आलं पाहिजे, आणि तें तर आपल्याला मुळींच येत नाहीं. मग हा धंदा आपल्याला काय उपयोग ?

कृष्ण०-तर मग, कापड तयार करण्याची गिरणी सुरू करावी.

विश्वास० कृष्णराव, तें कांहीं जेवायचं काम नाहीं, ह्मणे काय गिरणी सुरू करावी; गिरणी चालवायला उत्तम माहितगार लोक लागतात, ते आपल्याजवळ कुठे आहेत ? छेः हा पण धंदा आपल्याला नाहीं पसंत. कृष्णराव, माझ्या मनांत आपण जवाहीर, सोनं, चांदी ह्या मालाची मोठी पेढी घालावी. कारण ह्या मालाची मला उत्तम परीक्षा आहे. त्यांत माझा हात धरणारा मनुष्य क्वचितच सांपडेल.

कृष्णराव-पण ह्या धंद्याला भांडवल अतोनात लागेल.

विश्वासराव-तुला नको भांडवलाची काळजी; तें पुरवणारा मी खंबीर आहें. असं भांडवल भांडवल तें किती लागेल ?

कृष्ण०-जवाहीर खरेदी करायचं ह्मटलं तर जवळ जवळ निदान लाख दीडलाख रुपये तरी गुतवावे लागतील.

विश्वास०-बस्स ? इतकं जवाहीर खरेदी केलं ह्मणजे पुरे?

कृष्ण०-हो, अगदीं रगड होईल. सोनं साठ हजारांचं व चांदी चाळीस हजारांची खरेदी केली ह्मणजे सध्यां

पुष्कळ होईल. मग ज्या मानानें विक्री होईल व जो माल जास्त खपेल तोच आणावा ह्मणजे झालं.

**विश्वास०**—कृष्णराव, तुझ्या मतें लाख दीड लाखांचं जवाहीर व एक लाखाची सोनं चांदी मिळून एकंदर दोन अडीच लाखांचं भांडवल असलं ह्मणजे पुरेल ना? ठीक आहे झाला तर हाच बेत कायम.

**कृष्ण०**—होय झालाच. आतां ह्या जिनसा लवकरच खरेदी केल्या पाहिजेत. सध्यां सोनं व चांदी इतकी स्वस्त झाली आहे कीं, बोलायची सोय नाहीं. ही वेळ जर साधली तर आपला बराच फायदा होईल. जवाहीर सुद्धां स्वस्त झालं आहे ह्मणतात. विश्वासराव योग तर किती चांगले आले आहेत पहा, आपण हा विचार मनांत आणायला आणि हे जिन्नस स्वस्त व्हायला एकच गांठ पडली, तेव्हां आपण मोठे पुण्यवान आहांत यांत संशय नाहीं.

**विश्वास०**—पेढीला जागा अगदीं नाक्यावर पाहिजे. महिना साठ रुपये भाडं पडलं तरी हरकत नाहीं. पेढीची जागा नेहमीं स्वच्छ ठेऊन मोठ मोठ्या लोकांस येऊन बसण्यास पेढी ह्मणजे एक योग्य ठिकाण झालं पाहिजे. तूं जागेचा तपास कर आणि मला येऊन कळव, ह्मणजे लागलीच ती जागा कायम करूं. व जिन्नस देखील उद्यांच खरेदी करूं. बरं, मी जातों आतां.(जातो.)

**कृष्ण०**-मी पण येतोंच. ( जातो व पडदा पडतो. )

## प्रवेश ९ वा.

पात्रें-विश्वासराव, कृष्णराव व व्यापारी गणपतराव.

स्थळ—पेढी.

( गणपतराव पेढीवर बसला असतां पडदा उघडतो. )

गणपत०–( आपल्याशीं ) आजकाल कोणत्याच धंद्यांत अर्थ उरला नाहीं. यःकश्चित किराणा जिन्नस विकणाऱ्या व्यापाऱ्यांचीसुद्धां चांगलीशी विक्री होत नाहीं, मग आमच्या सारख्यांची झाली नाहीं ह्मणून त्यांत मोठं नवल नाहीं. लोकांजवळ जेव्हां पैसा असेल तेव्हां ते आमचे पेढीवर जवाहिराची खरेदी करायला येणार. त्या पैशाची आणि आह्मां लोकांची गांठच पडत नाहीं. किती तरी रक्कम मालांत गुंतून पडली आहे, तिचं नुसतं व्याज मात्र अंगावर भरावं लागतं आणि माल तर मुळींच संपत नाहीं. तूर्त दोन एक लाख रुपये कोठें तरी पाहणं जरूर आहे. ह्या दुसऱ्यांच्या रकमा निव्वळ अंगावर पडल्यामुळें जेवण सुद्धां गोड लागत नाहीं. सोनं चांदीचा भाव तर अगदींच उतरत चालला आहे. खरेदी तेवीसाची आणि विकावं लागत आहे विसांनी ! काय हा उलटा रोजगार होऊन बसला आहे पहा. हा व्यापारही नको आणि पैसाही नको; चंबू गवाळं आटपून घरीं जाऊन स्वस्थ बसावं. (विचार करून ) छेः असं भागूबाई सारखं भिऊन कसं चालेल?

व्यापार करतां सोळा बारा चाललेच आहेत. जिथें सांडलं तिथेंच जर सोधलं तर सांपडेल ह्या न्यायानं एखाद वर्ष जरी व्यापारांत नुकसान झालं तरी तें पुढें भरून निघणार नाहीं कशावरून ?

( विश्वासराव व कृष्णराव येतात. )

**विश्वास**०–( व्यापाऱ्यास ) कां, गणपतराव येवढा विचार कसला चालला आहे ?

**गणपत**०–या, विश्वासराव बसा; ( दोघांस गादीवर बसवतो ) जवाहीर किती नामी आलं आहे पण, आपल्यासारख्याला अगदीं वापरण्या लायक आहे. नुकता हा कालच माल आला. ( मालाचे निरनिराळे नमुने दाखवतो. )

**विश्वास**०–( माल पाहून ) गणपराव, माल तर अगदीं चोख आहे. ह्या पैकीं दीड लाखाचं जवाहीर काढा. सोनं, चांदी स्वस्त आहे ह्मणून ऐकतों ?

**गणपत**०–होय, त्यानी तर आह्माला साफ बुडवलं !

**विश्वास**०–सोनं काय भाव ? भाव मात्र व्यापारी पद्धतीचा सांगा.

**गणपत**० आज, सोन्याला वीस भाव आहे. सोनं किती काढूं ?

**विश्वास**०–इतकं कांहीं फार नको. साठ हजारांचं द्या ह्मणजे पुरे. चांदी कशी आहे ?

गणपत०-उत्तम चिनई चांदी दहा आणे आहे.

विश्वास०-द्या, ती पण चाळीस हजारांची.

गणपत०-ठीक आहे ( सर्व माल बांधून पुढें ठेवतो. )

विश्वास०-आकडा काय झाला, तुमचा?

गणपत०-(हिशेब करून आकडा देतो ) अडीच लाखांची रक्कम झाली.

विश्वास०-( गणपतरावास पैसे देऊन ) हीं घ्या रक्कम. ( कृष्णरावास ) कांहीं घ्यायचं राह्यलं नाहीं ना कृष्णराव?

कृष्ण०-नाहीं; सर्व घेतलंच.

विश्वास०-तर मग चला आतां आपल्या पेढीवर, एखादा हमाल पहा.

( कृष्णराव हमाल पाहण्यास उठतो. )

गणपत०-( कृष्णरावास उठलेला पाहून ) कृष्णराव, तुह्मी हमाल कशाला पाहतां? बसा, पानसुपारी तर खा. मी सगळी व्यवस्था केली आहे. फक्त आपल्या पेढीचा पत्ता द्या ह्मणजे झालं. ( सुपारी फोडून देतो. )

विश्वास०-( पानसुपारी खाऊन ) बरं आहे. ( पत्ता लिहून ) हा घ्या पत्ता. जातों तर आतां, माल लवकरच पाठवा. ( दोघे जातात. )

गणपत०-एखादे वेळीं असा येतो योग! मी दीड दोन लाखांच्या फिकीरींतच होतों. परमेश्वराची कृपा असेल तर कसलीच पंचाईत नाहीं.

## प्रवेश ६ वा.

पात्रें–विश्वासराव व कृष्णराव.

स्थळ–विश्वासरावाचा खासगी दिवाणखाना.

( विश्वासराव बसला असतां पडदा उघडतो. )

विश्वास०–( आपल्याशीं ) माल चांगला स्वस्त पडला. ह्याच मालाला अलबत नाहींतरी तीन लाख रुपये पडायचे. आतां मात्र पेढीचा सर्व बेत ठीक जमला. काल पासून कृष्णरावाला अतिशय आनंद झाला आहे. कसाहि प्रसंग आला तरी तो माझ्या विरुद्ध कधींच जायचा नाहीं. बाबा ह्मणतात, व्यापाराच्या कामीं कोणावरही फाजील विश्वास ठेऊं नये. पण, सर्व गोष्टी आपण एकट्यानेंच करायच्या ह्मटल्या तर चालावं कसं? दुसऱ्यावर थोडा तरी विश्वास हा टाकलाच पाहिजे. बाकी येवढं खरं आहे कीं, आमच्या लोकांनां एकमेकांची उच्चस्थिति मुळींच बघवत नाहीं. एकानं दोन मजली घर बांधलं कीं दुसऱ्यानं तें मुळापासून खणून काढण्याची इच्छा केलीच. आह्मां लोकांना इतकी कंगाल स्थिति येण्याला कारण तरी हेंच. मनुष्य जात्या सरळ असला तरी संगतीनं तो विघडतो. कृष्णराव जात्या लबाड नाहीं, त्याला जर कोणी वाईट उपदेश केला आणि त्याचं मन फिरलं तर कांहीं सांगवत नाहीं. पण त्याच्या हातून

तरी असं होणार नाहीं. कृष्णरावाचं वर्तन आज पर्यंत मज जवळ सरळ व पूज्यभावाचं आहे. मला जरा दुःख झालं तर त्याच्या डोळ्यांतून खळकन पाणी येतं, इतका तो दयाळू आहे. तो माझ्या इतका कह्यांत आहे कीं, एखादं काम सांगायची खोटी कीं त्यानं तें केलंच समजावं. मी जर त्याला जेऊं नको ह्मणून सांगितलं तर तो खात्रीनं जेवणार नाहीं; शिवाय, माझ्याविषयीं त्याच्या मनांत वाईट भरून देणारे लोक असतील असं मला मुळींच वाटत नाहीं; कारण, प्रत्येक जण आमचा ओशाळा असून आमच्या विरुद्ध गेल्यानं निभाव लागणार नाहीं हें जाणूनच आहे.

( इतक्यांत कृष्णराव येतो. )

**कृष्ण०**–( प्रवेश करून बसल्यावर ) विश्वासराव, पेढी तर स्थापन झालीच; उणीव कसलीच उरली नाहीं.

**विश्वास०**–कृष्णराव, तुझ्या बरोबर मी व्यवहार करावा असं खुद्द माझ्या वडिलांच्या मनांत नाहीं. असं असून मी वडिलांचं न ऐकतां हेक्यानं तुझ्याबरोबर व्यवहार करीत आहें. पैशाचं काम अगदीं खोटं आहे. इतके दिवस तुझा आणि माझा जो व्यवहार होता, तो केवळ मित्रत्वाचाच; त्यांत पैशाचा संबंध नव्हता; परंतु आतां तुला मजजवळ फारच नेकीनं वागलं पाहिजे. नाहींतर पैसा पाहिल्या बरोबर तोंडाला

सुटेल पाणी; त्यापेक्षां मला वेळींच सांगितलंस तर बरं. नाहींतर आरंभीं नेकी दाखवून मग बेइमानी करशील तर त्यापासून दोघांच्याही अब्रूला बट्टा लागेल. मला नेहमींच तुझ्यावर नजर ठेवतां येईल असं मुळींच नाहीं. पेढी तुझ्या नांवावर सुरू केली आहे, त्यापेक्षां तिचा मालक लोकांच्या दृष्टीनं तूंच होणार आहेस. परंतु खरी स्थिती तुला कधींच विसरतां कामा नये.

**कृष्ण**:–विश्वासराव, तुह्मांला माझ्या आजपर्यंतच्या वर्तनाचा अनुभव आहेच; शिवाय मी तुह्मांला असं सांगतों कीं, जों पर्यंत ह्या जिवांत जीव आहे तों पर्यंत मी तुमच्याशीं बेइमान होणार नाहीं, हें लक्षांत ठेवा. तुमचं जें सूख तेंच माझं. ज्यानं आपल्याला आश्रय दिला त्याच्याच डोक्यावर हात फिरवणारां पैकीं मीं नाहीं मला पैशांची जरूर लागली तर तुह्मांला विचारल्या शिवाय एका सुतळीच्या धाग्याला सुद्धां शिवणार नाहीं. मी नुसता तोंडानंच कशाला बोलूं? अनुभव आला ह्मणजे पक्की खात्री होईल. मी तुमच्याशीं नेकीनं वागलों तरच माझं हित होईल; नाहींतर मला कुत्रा सुद्धां विचारणार नाहीं. मी असा बाणा धरला आहे कीं, लोकांनीं माझं वर्तन पाहून 'हा मोठा इमानी आहे' असं नेहमीं ह्मटलं पाहिजे. माझ्या मनाला तुमच्या विरुद्ध कल्पना शिवणार सुद्धां नाहींत. तुह्मी त्याबद्दल अगदीं बेफिकीर असा. माझ्या बद्दल तुह्मांला

मुळींच शंका नको. ह्यापेक्षां मला जास्त सांगतां येत नाहीं; कारण, मी आपल्या तोंडानेंच माझी स्तुति करूं लागलों, तर लोक मला मूर्ख ह्मणतील.

विश्वास०–कृष्णराव, तुझ्या भाषणावरून तूं माझ्याशीं बेइमान होशील असं मला मुळींच वाटलं नाहीं. पण माझं तुला पुन्हां पुन्हां इतकंच सांगणं आहे कीं, आपला धंदा जर चांगला व्यवस्थित चालला तर आपल्या दोघांनाही पैसा व मान ह्यांची कधींच तूट पडणार नाहीं. पण, जर का तूं दगलबाजी केलीस तर मात्र दोघांच्या फजीतीला पारावार राहणार नाहीं; तेव्हां ह्याचा नीट विचार कर.

कृष्ण –विश्वासराव, मला ह्या पेक्षां कांहीं जास्त सांगतां येत नाहीं. मीं ह्मणतों ह्याचा अनुभव आपल्याला खचीत दाखवीन. प्राण गेला तरी बेहेत्तर पण तुमच्याशीं कधींच बेइमान होणार नाहीं.

विश्वास०–कृष्णराव, हें अगदीं खरं बोलतो आहेसना तूं?

कृष्ण०–खरं ह्मणजे? यांत तिळमात्र शंका नको समजलांत?

विश्वास०–तर मग घे माझ्या कंठाची शपथ.

कृष्ण०–( कंठास हात लाऊन ) तुमच्या कंठा शपथ, मी प्राण गेला तरी तुमच्याशीं बेइमान होणार नाहीं. ( हात काढून ) झालं आतां?

**विश्वास०**–कृष्णराव, आतां जेवण आटपून लवकरचं पेढीवर जा; मी पण जेवलों ह्मणजे येतों तिकडेच. पण काल विक्री किती झाली ?

**कृष्ण०**–( आनंदानें ) सात हजारांची झाली.

**विश्वास०**–वः ठीक आहे; असंच नीट चालूं दे.

**कृष्ण०**–बरं मी जातों आतां नाहींतर उशीर होईल

**विश्वास०** बरं जा.

( कृष्णराव जातो. )

( पडदा पडतो. )






# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

पात्रें–विश्वासराव, सुशीला, जनूभट व कृष्णराव.

स्थळ–समुद्रकिनारा.

( समुद्रावर बसले आहेत असा पडदा उघडतो. )

विश्वास॰ मित्रा, आपले तर बोवा पाय थकले !

कृष्ण॰–तर मग आपण थोडासा विसावा घेऊं तुला पायांनीं चालण्याची मुळींच संवय नाहीं ह्मणून इतका थकलास. मला कांहीं सुद्धां झालं नाहीं; होईल कशाला, आह्मी मोठे नशीबवान पडलोंना? नेहमीं पायांनीं इकडून तिकडे फिरतांना पायांनां अगदीं घट्टे पडून गेले आहेत. आण्णांनां घोडा घ्या ह्मणून ह्मटलं तेव्हां ते ह्मणाले ह्या वयांत मनुष्यानं पायांनींच चालण्याची संवय ठेवावी. एकदां का गाड्याघोड्यांची चटक लागली कीं जरा चालायचं ह्मणजे त्यांच्या अगदीं जिवावर येतं. आपल्या सारख्या गरीबांनां घोडा काय करायचा आहे?

विश्वास॰–जाऊं देरे; तुझे आण्णा तसेच चिक्कू आहेत. मी परवां संध्याकाळीं घोड्यावर बसून फिरायला गेलों होतों तेव्हां–

**कृष्ण०**—तेव्हां काय, कुठें पडलास वाटतं ?

**विश्वास०**—तुला अगदींच कसं कळत नाहीं !

**कृष्ण०**—तूं सांग तर मग; संध्याकाळीं काय झालं ?

**विश्वास०**—अरे व्हायचं काय; मी विरेश्वराच्या दर्शनाला गेलों होतों; अगदीं संध्याकाळ झाली होती.

**कृष्ण०**—इतका लपंडाव कशाला, स्वारीचा बहुतकरून एखाद्या जाळ्यांत पाय गुंतला आहे !

**विश्वास०**—तूं तरी बरीच अक्कल चालवतोस ?

**कृष्ण०**—सांगा एकदां काय आहे तें. माझ्याजवळ किती दिवस लपवून ठेवाल ? कधीं तरी सांगावंसं वाटणारच मग आतांच कां सांगेनास.

**विश्वास०**—( हंसून ) मित्रा, किती गोड वारा येतो आहे, येथून हालूंच नये असं वाटतं; काय समजलास ?

**कृष्ण०**—आलं; माझ्या सगळं लक्षांत आलं. सांग आतां लवकर.

**विश्वास०**—सांगूं ? ऐक तर. परवां संध्याकाळीं मी फिरायला निघालों; देवळाजवळ आलों तों माझा घोडा बुजला; ह्मणून मी खालीं उतरलों. घाईघाईनं उतरतांना एका कुमारिकेच्या अंगाला माझा धक्का लागला; तेव्हां तिनं मागें वळून पाहिलं आणि ह्मणाली 'कोण, विश्वासराव तुह्मी कां ?' असं ह्मणून हंसली आणि चट-

कन देवळांत शिरली. तेव्हां मी पण मोतद्दाराला घोडा धरायला सांगून तिच्या पाठोपाठ देवळांत शिरलों. जेम तेम देवदर्शन तर अगोदर केलं ह्मणा; आणि तिला ह्मटलं, काय हो, तुह्मी मला माझ्या नांवानं हाक मारलीत तेव्हां ओळख आहे कीं काय ? त्यावर ती ह्मणाली 'ओळख जरी नसली तरी आपण प्रसिद्ध, तरुण सावकार पुत्र आहांत' कृष्णराव, हे तिचे गूढ शब्द ऐकून माझ्या शरीराचं केवळ पाणीच झालं! एक सारखी डोळ्यापुढें दिसते आहे.

**कृष्ण॰**-तें राहूंदे; पण पुढें काय झालं तें अगोदर सांग.

**विश्वास॰**—आणखी कांहीं झालं नाहीं. इतकं बोलून लाजत लाजत ती चटकन निघून गेली! देव करो आणि दोघांच्याही मना सारखं होवो.

**कृष्ण॰**—अशी कोण ती ?

**विश्वास॰**—सोन्याला मीं विचारलं तेव्हां 'ही जनूभटजीची मुलगी' असं तो ह्मणाला. कृष्णराव, मला तिच्या शिवाय कांहींच सुचत नाहीं. तिचं स्मरण झाल्या-बरोबर मी अगदीं वेडाऊन जातों. काय करावं! ( गोंधळल्या सारखें करून पाण्याकडे टक लाऊन पहातो व त्यास झोंप लागत. )

**कृष्ण॰**—( हातास हिसडा देऊन ओठें वाजवून द्वेषानें आपल्याशीं ) हा दुष्टा, मी जिला स्त्री करूं पाहतों आहें

तिच्यावरच तूं नजर ठेवलीस अं? ठीक आहे. ( विचार करून ) तिचं ह्याच्यावर प्रेम आहे असं दिसतं. न जाणो हा फार सुंदर व श्रीमान आहे ह्यामुळें ती ह्याच्याशीं लग्न लावील, आणि आपल्याला चुरमुरे खात बसावं लागेल! तिचं माझ्यावर मन बसण्याला काय बरं तोड काढावी? ( विचार करून ) ह्या कामांत विश्वासरावाचं आणि माझं वाकडं पडणार आहे. कांहीं हरकत नाहीं; त्याला मी नाहीं आतां भीत. ज्या स्त्रीवर मी मन ठेवलं तिच्यावरच ह्यानं कां ठेवावं? ह्या बद्दल त्याला चांगलंच प्रायश्चित्त दिलं पाहिजे. थांब; सगळ्या गांवभर तुझी विटवीट करून टाकतों. मला, आतां रुपायांनां मुळींच तोटा नाहीं. सगळी पेढीच करतों गट्ट ह्मणजे झालं. अनायासें माझ्याच नांवावर ती आहे. ठीक आहे; आतां ह्याच उद्योगाला लागलं पाहिजे. कांहीं दिवस पेढी बंद राहिली तरी हरकत नाहीं. वाटेल तें करीन पण सुशिला विश्वरासरावाला मिळूं देणार नाहीं; प्राण गेला तरी बेहेत्तर. आतां जेवढा भपका करतां येईल तेवढा करीन; उद्यां दोन घोड्यांची गाडी करतों. लोकांनीं असं ह्मटलं पाहिजे कीं, कृष्णराव आतां श्रीमंत झाला. असा श्रीमंतीचा बहाणा केल्यावर ती मला खात्रीनं वश होईल. तिच्या मनांत विश्वासरावाबद्दल असं वाईट भरून देतों कीं, तिनं त्याचा तिरस्कार हटकून केलाच पाहिजे.

झाला हाच बेत कायम झाला. पण विश्वासराव उद्यां सकाळीं पेढीवर आला तर त्याला काय सांगावं? ( विचार करून ) त्याला काय सांगायचं आहे; विचारतो कोण त्याला; पेढीचा मालक मी. आतां जातांना कुलुपावर सील करून ठेवतों ह्मणजे झालं. मग काय त्याची थोबडी लागली आहे कुलूप फोडण्याची खाडकन फौजदारी करीन ( आठवल्या सारखें करून ) अरे, पण पेढीच्या कुलुपाची दुसरी किल्ली ह्या चोराजवळ आहे! ( त्याचे खिसे तपासून किल्ली हातांत घेऊन ) केवढं माझं भाग्य! आज ही किल्ली मला मिळाली नसती तर माझे सगळे बेत फुकट गेले असते. ( त्याच्याकडे पाहून ) स्वारी तर अगदीं गार झाली आहे. आतां ह्यांनां राहुंद्या इथेंच. आपण निघून जावं झालं. जनूभटजीची मुलगी कोण मिळवतो पाहूं. ( मिशीवर ताव देत देत चकटन निघून जातो. )

( इतक्यांत जनूभट व सुशिला फिरत येतात )

**जनू०**—मुली, ही सूर्यास्ताची वेळ आहे आणि अनायासें आपण ह्या वेळेला इथें आहों. मला वाटतं समुद्रस्नान करून सायंसंध्या करून घ्यावी झालं.

**सुशिला** खरंच भाऊ; तुह्मी रोज कांहीं इकडे येत नाहीं; मी समुद्र पाहिला नव्हता तो दाखवण्यासाठीं ह्मणून आलांत; नाहींतर तुह्मी कसले येतां, मला घरीं एकटीला टाकून. आई असती ह्मणजे तुह्माला रोज

इकडे यायला सांपडलं असतं. आतां खुशाल तुह्मी आपली आंघूळ आणि संध्या करा. मी इथे दगडावर बसतें.

जनू०—बरं तर, मी घेतों स्नान संध्या आटोपून, ( स्नानास जातां जातां ) पण मुली, फिरत फिरत लांब जाशील हो एखादी ?

सुशिला—नाहीं; भाऊ, ही मी इथेंच राहत्यें उभी; तुह्मी आंघूळ करा. ( जवळच झोंपी गेलेल्या विश्वासरावाकडे नजर जाऊन ) अगबाई, हे इथे कसे झोंपी गेले तरी! ( इकडे तिकडे पाहून ) जवळ कोणीच नाहीं दिसत. ( विकारवश होऊन ) ह्यांनां जागे करूं का ? अशी वेळ पुन्हां कधींच यायची नाहीं. ( जनूभटजीकडे पाहून ) भाऊंची अझून आंघूळ नाहीं झाली; त्यांना पुष्कळ अवकाश आहे. आतां ह्यांनां जागे केल्या-शिवाय मला बाई चैन नाहीं पडायचं! ( इकडे तिकडे पाहून ) छे बाई आतां करतेंच जागे. (त्यास हलविते)

विश्वास०–(जागा होऊन चपापून ) काय, मी स्वप्नांत तर नाहीं ना ? ( चिमटा घेऊन पहातो ) हाय; चिमटा घेतला तर मला कळतो. छे:मी चांगला जागा आहें.

सुशिला–( लाजत लाजत ) झोंपेला ठिकाण तरी चांगलंच पाह्यचं ह्मटलं ?

विश्वास०–( प्रेमानें ) सुशिले, तूं एकटीच इकडे कोणी-कडे ? ये, जरा अलीकडे ये.

सुशिला–( लाजून) मी कांहीं एकटी नाहीं हो, नाही तर–

विश्वास०–नाहीं तर काय ? दुसरं कोण आहे ? ( तिचा हात धरून जवळ बसवितो. )

सुशिला-हें काय असं ? कुणी पाहिलं तर काय ह्मणेल ?

विश्वास०–ओहो ! केवढा पण शास्त्रार्थ सांगते आहे ! बरं मी तुला असं विचारतों तूं इकडे कोणीकडे आलीस ?

सुशिला–मला माझ्या भाऊंनीं समुद्र दाखवायला आणली आहे. देवाजवळ एक डोळा मागून त्यानं दोन दिलेन तर ते नकोसेका आहेत कोणाला ?

विश्वास०–कोणी, भाऊंनी ? भाऊ कोण ?

सुशिला०–कोण ह्मणजे, आपले × × × ना ?

विश्वास०–काय, माझे ?

सुशिला–( मान हालवून लाजत ) होय आपलेच हो.

विश्वास०–माझे ? ( विचार करून ) माझे कोण ?

सुशिला–( पदराचें टोंक दातांत धरून लाजत लाजत ) मी कोण आपली ?

विश्वास०–( मोठ्या प्रेमानें हंसून ) माझ्या तोंडून एकदां ऐकायचं आहे वाटत ? तूं माझी लाडकी ( तिची हनुवटी हालवून ) झालं आतां, कळलं ना ?

सुशिला–( मुरकून ) मग माझे भाऊ ते आपले कोण ? ( लाजून खालीं पहाते )

विश्वास०–हं हं; सासरे का? चा ग टवळे! मग मला सरळच कां नाहीं सांगितलंस? (तिचा गाल उपटतो)

सुशिला (हात दूर करून) सोडा गडे; तिकडे भाऊंची संध्या सुद्धां झाली असेल ते नाहीं तर येतील इकडे, मग होईल फजीती. सोडा आतां जाऊं द्या.

विश्वास०–बरं जा तर; मलाही फार वेळ झाला. पण पुन्हां भेट?

सुशिला–(लाजत लाजत) जेव्हां ह्मणाल तेव्हां; बरं येत्यें तर? (असें ह्मणून हळु हळु त्याच्याकडे पहात पहात जाते.)

विश्वास०–(ती गेलीसें पाहून) हीचं माझ्यावर पूर्ण प्रेम आहे यांत मिलकुल संशय नाहीं. (खेदानें) आतां हिला सोडून घरीं जायचं ना? मला खायला येईल तें घर! (चपापून) अरे, पण कृष्णराव कोठें गेला! (इकडे तिकडे पाहून) छे:तो घरींच गेला मला वाटतं. आपण देखील जावं हें बरं.

(विश्वासराव जातो.)

(पडदा पडतो.)



प्रवेश २ रा.

पात्रें—कृष्णराव व मन्या.

स्थळ—कृष्णरावाची खोली.

( कृष्णराव बसला असतां पडदा उघडतो )

कृष्ण०—( त्वेषानें ) मी सुशिलेवर प्रेम करतों हें विश्वासरावाला नक्की ठाऊक असलं पाहिजे. असं असून त्यानं जाणून बुजूनच तिला वश केली आहे खास ! कांहीं ही असो सुशिलेला त्याच्या हातीं लागूं द्यायची नाहीं अशी ज्यापेक्षां मी प्रतिज्ञा केली आहे त्यापेक्षां ती मला पार पाडलीच पाहिजे. पेढीची मजबुती अगदीं मना सारखी झालीच; आतां या ह्मणावं पेढीवर सवकले नाहीं पेढीवर यायला ? आह्मी सर्व दिवसभर तिथें माशा सारखी तळमळ करावी आणि हे यजमान साहेब खुशाल झोंपा ताणून यायचे कारण, भांडवल ह्यांचं पडलं ना ? पण ह्मणावं आतां चांगलाच शहाणा झालों आहें. आतां माझ्या जवळ आपली डाळ नाहीं शिजत हें खूप समजा. बरं पण ती माझ्या हातीं कशी यावी ? ( विचार करून ) वाःचांगलीच कल्पना सुचली. माझी आई नेहमीं माझ्याबहिणींनां ह्मणे 'ती जनूभटजींची मुलगी कशी लिहित्ये वाचत्ये ? नाहीं तर तुह्मी नुसत्या ह्मशी ' तेव्हां, विश्वासरावाच्या सहीचं तिला ल्याहावं पत्र कीं, हें पत्र देखत ह्याच

माझ्या सेवका बरोबर कृष्णरावाच्या घरीं निघून ये; मी अगदीं वाट पहातों आहें असं पत्र तिनं वाचलं ह्मणजे लागलीच लागबगीनं ती इकडे येईल. ती आली कीं, माझा बेत साधलाच.

( इतक्यांत मन्या येतो. )

**मन्या**–( प्रवेश व रामराम करून ) इसवासरावांचा सोन्या आलायां; त्यो ह्मनत्यो पेडीच्या चाव्या होव्यात.

**कृष्ण०**–( संतापून ) काय, किल्या ? ( एकीकडे ) आतां येतील आपल्या हातात; सोडा किल्यांची आशा ह्मणावं ! ( उघड ) जा, मी गांवाला गेलों आहे; महिना दीड महिना परत येणार नाहीं ह्मणून त्याला सांग; आणि लवकर परत ये; नाहींतर बसशील त्याच्याशीं बाता मारीत; जा लवकर ये समजलास ?

**मन्या**–हा असाच आलों ह्मराज बगा ( जातो )

**कृष्ण०**–( पत्र लिहितो, तें लिहून झाल्यावर दरवाजाकडे पाहून ) हा मन्या ह्मणजे पहिल्या पासून चेंगटच; तो तेवढ्यांतल्या तेवढ्यांत चार दोन गप्पा झोंकल्या शिवाय कुठला यायला. त्या गाढवाला वेळेची किमंतच कळत नाहीं. किती रीस मनुष्य हा ?

( इतक्यांत मन्या येतो )

**मन्या**–(प्रवेश व रामराम करून ) ह्मराज; काय हाये कामगिरी ?

कृष्ण०—( पत्र देऊन ) हें घे पत्र, आणि तीं जनूभट-जीची मुलगी ठाऊक आहे ना तुला ?

मन्या—व्हय व्हय; जनूभट मंजी त्यो भाऊभट म्हनत्यात त्योच नव्हका ?

कृष्ण०—( तिरस्कारानें ) अरे हो, तोच; उगीच मधें मधें बोलेल. ( शांतपणें ) त्याची मुलगी सुशिला आहे ना ? तिच्या जवळ दे. दुसऱ्या कोणा जवळ ही देऊं नकोस. नाहींतर भलताच कोणी मागेल आणि त्याला तूं बेडगळा सारखा देशील. तिच्या शिवाय दुसऱ्याला द्यायचं नाहीं हें लक्षांत ठेव. तिनं, कोणाकडून आलास असं विचारलं तर तिला विश्वासरावा कडून आलों आहें असं सांग. तिला तूं आपल्या बरोबरच घेऊन ये. समजलास ?

मन्या—व्हय म्हाराज, आता त्याना घ्येऊनशान येतु बगा. ( जातो )

कृष्ण०—( मन्या गेलासें पाहून ) मन्या तिला घेतल्या शिवाय येत नाहीं खास. पेढीचं सील कायम आहे कीं नाहीं हें आपण प्रत्यक्ष पहावं हें चांगलं.

( जातो )

---

## प्रवेश ३ रा.

पात्रें-तात्यासाहेब व शास्त्रीबोवा.

स्थळ-तात्यासाहेबांचा खासगी दिवाणखाना.

( तात्यासाहेब बसले असतां पडदा उघडतो. )

तात्या०-( आपल्याशीं ) मी विश्वासाला पुष्कळ उपदेश केला पण तो मुळींच ऐकेना. त्याला एकदम नाहीं ह्मणायचं माझ्या अगदीं जिवावर आलं पण आतां तीच वेळ येते कीं काय कोणाला ठाऊक. थोर माणसं उपदेश करतात तो उगीच नाहीं; त्यांच्या हयातींत त्यांनां पुष्कळ टक्के टोणपे खावें लागल्यामुळं सगळ्या गोष्टींचा त्यांनां अनुभव येऊन चुकलेला असतो; पण ह्या मुलांनां तो काहीं विचार नाहीं. आपल्या मर्जी प्रमाणं वागण्याचा आग्रहच धरून बसतात. मोठीं माणसं हिताच्या चार गोष्टी सांगायला लागलीं कीं त्यांचं डोकं उठलंच; इतकंच नव्हे, तर ह्यांनां आतां ह्मातारचळ लागल्यामुळं कांहीं तरी बोलत सुटतात असं देखील बोलायला तीं कमी करीत नाहींत विश्वासाला मी पहिल्यानंच सांगितलं कीं, तो कृष्णराव लफंगा आहे ह्मणून; पण नाहीं, त्यानं आपलाच हेका पुरा केलान. कृष्णराव गांवाला गेला तर गेला पण पेढीची किल्ली तरी विश्वासाजवळ द्यायची होती; ती सुद्धां दिली नाहीं. जी दुसरी किल्ली विश्वासाजवळ

होती ती समुद्रावर सांडली तिचा ठिकाण नाहीं. तो घाईघाईनं ह्याच्याजवळ किल्ली आहे असं समजून निघून गेला असेल. किल्ली हरवली हें त्याला तरी काय ठाऊक ? ( विचार करून ) छे: कांहीं तरीं दगलबाजी खास आहे; कारण, त्यानं ह्मणे सील केलं आहे कुलपावर; तेव्हां ज्या अर्थीं तो सील करून गेला त्या अर्थीं त्याच्या मनांत खात्रीनं वाईट कल्पना आली असली पाहिजे. हजार वाटेनं त्यानं ती पेढी गडप केली यांत संशयच नको. त्यानं पेढीवर हात दिला तरी मी भीत नाहीं पण आताशें त्यानं विश्वासाला ज्या फंदांत पाडलं आहे ह्मणून ऐकतों. त्यापासून दोघांचं वाकडं पडून एकमेकांच्या जिवावर उठले नाहींत ह्मणजे मी मिळवलं. विश्वासा, मला आतां ह्मातारपणीं तूंच सुख देणार; तुझ्याशिवाय मला सगळं जग फुकट आहे. बाळा, अझून तरी तुझे डोळे उघडूं देत. त्याचा स्नेह आतां पुरे झाला. ( कोणी येत आहे अशा संशयानें दाराकडे पाहतो )

( शास्त्रीबोवा येतात. )

शास्त्री०–( प्रवेश व नमस्कार करून ) नमस्कार, तात्यासाहेब; ठीक आहे ना ?

तात्या० होय; आपल्या आशिर्वादानं ठीक आहे. या, असे बसा; फार दिवसांनी भेटलांत.

शास्त्री०–होय; पण मी मुद्दाम आलों आहें.

तात्या०—कां बरं ?

शास्त्री०—गांवांत अशी कांहीं बातमी आहे कीं, कृष्णराव पेढी बंद करून गांवाला निघून गेला कांहीं ह्मणतात तो बहुतकरून पेढीला ढेकर देणार; तो गांवांतच असून गांवीं गेल्याची त्यानं गप्प उठवली आहे. त्याला गाडींत बसून फिरायला जातांना पुष्कळांनीं पाहिलं आहे. ह्यावरून हा प्रकार कांहीं विपरीत आहे. असं होण्याचं कारण माझ्या कानावर निराळंच आलं आहे आणि बहुशः तेंच खरं असावं.

तात्या०—तें कोणतं ?

शास्त्री०—त्या जनूभटजींच्या मुलीशीं विवाह लावण्याचा कृष्णरावानं निश्चय केला आहे आणि त्याच उद्योगांत तो आताशें असतो पण सुशिलेचं मन आपल्या विश्वासरावांवर आहे असं ऐकतों. आणि ह्याच मुळें दोघांत द्वेष उत्पन्न झाला असावा !

तात्या०—(दुःखानें) आतां मात्र मला कांहीं सुचत नाहीं. तो कृष्ण्या विश्वासाचं काय करील नी काय नाहीं ! शास्त्रीबोवा, सुशिलेपेक्षां हजार पटीनं सुरेख मुलगी मिळेल; त्याला ह्मणावं सुशिलेचा नाद तूं सोडून दे, कृष्ण्याला तिच्या बरोबर खुशाल विवाह लाऊं दे; ह्या भानगडींत तूं मुळींच पडूं नकोस ह्मणावं शास्त्रीबोवा, काय करावं एकुलता एक मुलगा आणि

तो सुद्धां माझ्या सांगण्या प्रमाणं वागत नाहीं, हें माझं दुर्दैवच नाहीं का? तुह्मी तरी त्याला कांहीं सांगून पहा ऐकलन तर बरंच झालं; नाहीं तर तो आणि त्याचं नशीब! मी तरी काय करूं? त्याला त्या कृष्णरावाच्या नादीं लागून व्यापार करण्याची कांहीं जरूर का होती? खुशाल घरीं बसून विद्याभ्यासांत आनंदानं काळ घालवता तर आजच्या मितिला त्याला कांहीं कमी का होतं? पण माझंच नशीब कुठे धड आहे! शास्त्रीबोवा, सगळे हे दुर्दैवाचे खेळ आहेत. आज पर्यंत मुलगा नाहीं ह्मणून दुःख आणि आतां झाला तो हा असा निघाला!

शास्त्री०—तात्यासाहेब, पूर्व संचिता प्रमाणं जें जें होणार तें कोणालाही चुकवतां येत नाहीं. आपण मात्र ह्या मायाजाळांत सांपडून असं झालं असतं तर बरं झालं असतं असं ह्मणतों पण सर्व व्यर्थ आहे; जें व्हायचं तें कधींच चुकत नाहीं. परमेश्वराच्या मनांत काय आहे तें आपल्याला कसं कळणार! बरं; मी त्यानां उपदेश करून पाहतों; मग काय होइल तें खरं येतों तर आतां?

तात्या०—ठीक आहे.

( शास्त्रीबोवा जातात. )

( पडदा पडतो. )

## प्रवेश ४ था.

पात्रें–सुशीला, कृष्णराव व मन्या.

स्थळ–कृष्णरावाची खासगी खोली.

( कृष्णराव बसला असतां पडदा उघडतो. )

कृष्ण०–( आपल्याशीं ) पेढी संबंधीं विश्वासरावाची अक्कल तर अगदीं गुंग आहे. मी काय करतों आहें आणि काय करणार आहें ह्या बद्दल त्याला कल्पना सुद्धां नाहीं. तो बिचारा माझ्या विश्वासावर अझून स्वस्थच आहे. स्वस्थ न राहील तर काय करील. आतां तो माझ्या तावडींत पुरता सांपडला आहे. माझी भेट घेण्याकारितां तो बिचारा रोज माझ्या घरीं येतो. मी त्याला भेटेन तेव्हां तो माझ्याशीं बोलणार! मन्याला जाऊन तर बराच वेळ झाला; एकदां तिला घेऊन आला ह्मणजे मग मी कृतकृत्य झालों.

( इतक्यांत मन्या व सुशिला येतात. )

मन्या०–( राम राम करून ) ह्मराज त्येना ध्येऊनशान आलोया.

कृष्ण०–( सुशिलेस पाहून उठून ) या, बसा इथें खुर्चीवर; संकोचाचं कारण नाहीं, हें तुमचंच घर आहे. जेवणखाण व्हायचं असेलच ह्मटलं? घरांत सर्व तयारी आहे. मन्या, जा ह्यांनां आंगधुवायला

पाणी वगैरे द्यायला सांग; तूं ह्यांची चांगली बरदास्त ठेव. त्यांचं जें काय सामानसुमान असेल तें माझ्या पलंगा खालीं ठेव जा लवकर.

**मन्या**–व्हय म्हाराज. बाईसायेब, चला माज्या संग.

**सुशिला**–( भीतीनें ) कुठे नेतो आहेस मला ? मी इथे राह्यला का आल्यें आहे ? चल माझ्या घरीं मला पोचव.

**कृष्ण०** छे, छे: असं भलतंच काय हें ? मी म्हणजे आपल्याला परका का वाटतों ?

**सुशिला**–( रागानें ) तुमची नाहीं मला गरज. ( विचार करून आपल्याशीं ) मला पत्र लिहिलं कीं ह्या मनुष्या बरोबर निघून ये मी वाट पाहतों आहें. पण इथे स्वारी तर कुठे दिसत नाहीं. ( उघड ) स्वारी कुठे आहे ?

**कृष्ण०**–( मोठ्या डौलानें ) ही तुमच्या पुढेंच उभी आहे स्वारी.

**सुशिला**–माझी थट्टा करतां कीं काय ? अपरिचीत माण-साची थट्टा करायला लाज कशी नाहीं वाटत ?

**कृष्ण०**–हें बघा, ह्या कोरड्या फुशारक्या नका दाखवूं; जेथ पर्यंत मी रागावलों नाहीं तेथ पर्यंत–

**सुशिला**–( त्वेषानें ) हं, आपली जीभ आटपून धरा. तुमची आणि माझी मुळींच ओळख नसतां असं बोलण्याचं धाडस करूं नका.

**कृष्ण०**—ओळख केल्याशिवाय होत नाहीं.

**सुशिला**—पुरे पुरे; या उप्पर तुमच्या तोंडचा एक शब्द ही मला ऐकायला नको. ( आपल्याशीं ) ह्या मेल्यानं त्यांच्या नांवाचं पत्र लिहून मला फसवून इथे आणलं आहे खचित. ( उघड ) बऱ्या बोलांनी स्वारी कुठे आहे ती दाखवा.

**कृष्ण०**—( आपल्याशीं ) ही अशा रीतीनं वळणार नाहीं कांहीं तरी कापट्य लढवलं पाहिजे. ( उघड ) मला नाहीं ठाऊक स्वारी. आहे काय त्या खापऱ्या चोरा-जवळ, आणि तो हावा आहे कशाला? माझ्या सारख्या सुंदर व श्रीमान पुरुषाचा अव्हेर करून त्या घुवडाची इच्छा धरणं ह्मणजे निवळ वेडेपणा आहे. तूं त्या विश्वासरावाचा नाद टाकून दे. तूं सांगशील त्या प्रमाणं मी वागेन. जें जें तूं ह्मणशील तें तें ताबड-तोब तुला आणून देईन. मी ह्मणतों ही गोष्ट सुका-ट्यानं कबूल कर नाहींतर ह्या जन्माचं फुकट मातेरं करून घेशील.

**सुशिला**—(खवळून) आग लाव मेल्या तुझ्या थोबाडाला. इतकं धाडस करायला लागलास? असं बोलतांना तुझी जीभ कशीं गळून पडली नाहीं. देवानं चांगला माणसाचा जन्म दिला असतां एखाद्या पशुप्रमाणं कां वागतोस? शुद्धीवर ये. अशीं अभद्र भाषणं बोलून ह्या गरीब गाईला कां काटे लावतोस?

कृष्ण०–मन्या, बाहेरून दार लाऊन घे.

मन्या–जी ह्मराज.( असें ह्मणून दार लावतो )

कृष्ण०–( मन्या गेलासें पाहून ) माझं ह्मणणं कबूल करायचं आहे कीं नाहीं? कबूल केल्या शिवाय आपली सुटकाच नाहीं समजलांत? विश्वासरावाची आपल्याला मुळींच आशा नको.

सुशिला–( आपल्याशीं ) ह्या दुष्टानं वेळ मोठी कठीण आणली आहे. देवा, माझ्यावर इतका राग कां केलास? अशा रीतीनं माझा छल करण्यापेक्षां मला एकदम मरण तरी दे. ह्याचे हे अमंगळ शब्द मला कानांनीं ऐकववत देखील नाहींत. देवा, तुझ्या वांचून ह्यावेळीं मला दुसरा कोणीही सोडवणारा नाहीं. आतां माझा किती अंत पाहणार?

कृष्ण०–कां एवढा विचार सा पडला आहे? ( जवळ जाऊन ) बोलायचं नाहीं का?

सुशिला–हं, खबरदार; हो पलीकडे; मेल्या, मला विनाकारण छळतो आहेस पण देव तुला पाहून घेईल ( दार उघडण्यास जाते )

कृष्ण०–( सुशिलेस फिरवून ) आपलाच हेका धरूं नकोस; अशी वेळ पुन्हां येणार नाहीं. ( तिचा हात धरतो. )

सुशिला–( हातास हिसडा देऊन ) चांडाळा दूर हो.

मला मुकाट्यानं जाऊं देतोस कीं नाहीं? कां देऊं प्राण इथें?

कृष्ण०—( घाबरून आपल्याशीं ) आतां काय करावं? ही तर ऐकतच नाहीं. ही आतांच कबूल होणार नाहीं. इथें कांहीं दिवस राहिली ह्मणजे आपोआप वठणीस येईल. हिला फसवल्या शिवाय दुसरी तोड नाहीं. ( उघड ) हे पहा, इतका वेळ मी आपली थट्टा केली त्याची माफी असावी. माझ्या मित्रावर आपलं प्रेम कितपत आहे, याची मी परीक्षा पाहिली. कसोटी फार नामी उतरली. विश्वासराव माझ्या बैठकीच्या खोलींत आहे तिकडे चला मज बरोबर.

सुशिला-( धीर येऊन ) हो का? चला तर तिकडे.

( दोघें जातात. )

( पडदा पडतो. )

## प्रवेश ५ वा.

**पात्रें**—विश्वासराव वं शास्त्रीबोवा.

**स्थळ**—विश्वासरावाचा खासगी दिवाणखाना.

विश्वास०-( आपल्याशींच ) कृष्णरावाकडे जावं तों तो भेटतच नाहीं. ज्या कृष्णरावाकडे मी गेल्या बरोबर मला केवढा तरी मान मिळत असे, आणि आतां ह्याच कृष्णरावाकडे जावं तों तेथें माझा शिरकाव

सुद्धां होऊं नये? दारांत जायची खोटी तों पुढें भय्या आडवा आलाच! त्याची पूर्वींची स्थिति आणि आतांची स्थिति ह्यांत जमीन अस्मानाचा फरक पडला आहे. कृष्णराव श्रीमंत झाला असं जो तो ह्मणतो; पण हा एवढा श्रीमंत कशाच्या जोरावर झाला? ( विचार करून ) मला फसवण्याचा कृष्णरावाचा हे तू नसेल नां? होय; ह्मणूनच त्यानें पेढी बंद केली असावी. मी गेलों तरी तो भेटत नाहीं ह्याचं कारण तरी हेंच असलं पाहिजे. गांवाला गेल्या बद्दल नुसता बहाणाच आहे यांत संशय नकोच तरीच परवां फिरायला जातांना ती पहा कृष्णरावांची गाडी असं सोन्या बोलला परंतु त्या वेळेला माझ्या नाहीं लक्षांत आलं. एकंदरींत ह्या त्याच्या वर्तनावरून मला तो बुडवणार खास! तो माझा विश्वासघात कधींच करणार नाहीं अशी माझी पक्की खात्री होती पण आतां ती समूळ नष्टच झाली. मनुष्याची परीक्षा नुसत्या त्याच्या तोंडावरून होत नाहीं ह्मणतात तें अगदीं खरंच आहे. द्रव्याचा लोभ उत्पन्न होणं हा मनुष्य स्वभावधर्मच दिसतो. अशा रीतीनं फसून हळहळतांना पुष्कळ लोक मी पाहिले सुद्धां आहेत. पण ह्या धंद्याला आरंभ करतांना माझी अशी समजूत होती कीं, सगळेच लोक असे नसतील; तशांत कृष्णराव व मी ह्मणजे दोघांत परका भाव मुळींच नाहीं

तेव्हां हा पुढें असं करील हें माझ्या स्वप्नीं देखील नव्हतं. बाबांनीं मला सांगितलं त्यावेळीं त्यांच्या ह्मणण्याकडे मी मुळींच लक्ष दिलं नाहीं; परंतु आतां त्याबद्दल मला पश्चात्ताप वाटतो पण काय उपयोग! आधीं जातें बुद्धि आणि मग जातं भांडवल. त्याचा खेद करून काय उपयोग. वेळ आली ती पार पाडणं भागच आहे. त्याची त्या वेळची स्थिति पाहून मला खरोखर दया आली आणि मी त्याला भांडवल दिलं; तें सुद्धां बाबा नको ह्मणत असतांना. असं असून ह्यानं शेवटीं अशा थरावर गोष्ट आणावीना? मी तरी वेडाच खरा. कांहीं लोक असे हुषार असतात कीं, एखाद्याच्या तोंडावरूनच त्याची परीक्षा करतात. अशा लोकांनां बहुत करून फसण्याची वेळ येत नाहीं. मनुष्याच्या अंगांत डाव पेंच असणं जरूर आहे अशी माझी आतां खात्री होऊन चुकली. माझ्या सारखा भोळा मनुष्य असाच फसत असेल. कांहीं ही असो ह्या पुढें त्याच्याशीं मुळींच संबंध नसावा हें उत्तम. नाहीं तर आणखी किती गोते खावे लागतील ह्याचा नियमच नाहीं. लवकरच ठेंच लागून शहाणा झालों हें तरी एक चांगलंच झालं. कृष्णरावाची प्रत्यक्ष गांठ घेऊन एकदां काय तो खुलासा करून त्याचा संबंध तोडून टाकावा ह्मणजे झालं. ह्या वेळेस कदाचित तो भेटण्याचा संभव आहे

कारण, जेवण आटोपल्या बरोबर बाहेर जाणार नाहीं; विश्रांती साठीं बसला असेल तेव्हां तिकडेच जावं ( असें ह्मणून जाऊं लागतो )

( इतक्यांत शास्त्रीबोवा येतात )

**शास्त्री०**—कां विश्वासराव, घाईघाईनं कुणीकडे निघालांत ?

**विश्वास०**—नाहीं, जरासा जाऊन येणार होतों; या बसा; आज इकडे कोणीकडे ?

**शास्त्री०**—आपलं यावं ह्मटलं सहज. काय हो, तुमचं आणि कृष्णरावाचं वाकडं पडलं ह्मणून ऐकतों ?

**विश्वास०**—नाहीं, अझून पुरतं पडलं नाहीं.

**शास्त्री०**—विश्वासराव, ह्या फंदांत व्यर्थ पडलांत. आपण पैसे मागितलेत त्याच वेळीं कृष्णरावाच्या नादीं न लागण्या बद्दल तात्यासाहेबांनीं आपल्याला सांगितलं परंतु आपण तें ऐकलं नाहीं हें फार गैर केलंत. मुलांनीं वडिलांचं ऐकणं हें त्यांचं आदिकर्तव्य आहे. अझून तरी वेळींच सावध व्हा. झाले तेवढे खेळ पुरे झाले. या उप्पर त्याच्या नादीं तुह्मी रहाल तर खरोखर सांगतों, तुमचं बिलकूल हित होणार नाहीं. तो नाहीं नाहीं त्या व्यसनांत तुह्माला तोंडघशीं पाडील. पैशाच्या लोभानं तो कोणत्या वेळीं काय करील ह्याचा मुळींच भरंवसा नाहीं. मनुष्य जन्मास येऊन चार चौघांत नांव

लौकिक संपादन केला तरच उपयोग. त्याचा नाद आपण सोडला नाहीं तर ह्या जगांत आपण नांवा-रूपास याल अशी आशाच नको. तुमच्या वडिलांचा एवढा मोठा लौकीक तुह्मी राखलात तर उपयोग. नाहीं तर तुळशीच्या पोटीं भांग ह्या दूषणास तुह्मी पात्र व्हाल. अहो, वडिलांच्या कीर्तिचा अभिमान तुह्माला वाटलाच पाहिजे. तुह्मी आपलं हें लहान वय कृष्णरावांसारख्या लबाड लोकांच्या संगतीनं फुकट घालवूं नका येवढं माझं सांगणं आहे. ह्या लोकांची स्थिति ह्मणजे केवळ ताज्या घोड्यावरच्या गोमाशी सारखी. तुमच्या जवळ पैसा आहे तेथ पर्यंत हे तुमची हांजी हांजी करतील पण खिसा रिकामा दिसला तर मात्र तुमच्याकडे ढुंकून देखील पाहणार नाहींत. अशा रीतीनं फसलेले पुष्कळ लोक तुमच्या पाहण्यांत नाहींत का? मग? तुह्मी हा स्वीकारलेला मार्ग सोडून द्या. तो अगदीं आड रानाचा आहे त्यानं जर तुह्मी जाल तर खचीत एकाद्या कांटेरी भयंकर जाळींत सांपडाल आणि त्या मुळें आपल्या वडिलांच्या निष्कलंक कीर्तिध्वजाला डाग लागेल व सर्व जगांत अमान्य व तिरस्करणीय होण्याची तुह्मांला पाळी येईल ह्याचा विचार करा. माझं हें बोलणं तुह्मांला केवळ विषवत् लागेल पण त्याला इलाज नाहीं. माझं कर्तव्य मला बजावलंच पाहिजे.

**विश्वास०**—शास्त्रीबोवा, आपण ह्मणतां ह्या सर्व गोष्टी अगदीं खऱ्या आहेत. मी फारच मोठा अपराध केला. हा मार्ग सोडून देण्याचा मी निश्चय केला आहे. तुह्मांला त्याबद्दल मुळींच काळजी नको.

**शास्त्री०**—बरं तर, जातों आतां. पुराणाला जायचं आहे नाहींतर उशीर होईल.

**विश्वास०**—ठीक आहे; जा तर.

( शास्त्रीबोवा जातात. )

**विश्वास०**—( आपल्याशीं ) माझा तर निश्चय झालाच होता; त्यांत शास्त्रीबोवांचं सुद्धां तेंच ह्मणणं आहे. अशा कामांची हयगय बिलकुल होतां उपयोग नाहीं. कृष्णराव जाईल एखादा बाहेर. ( जातो. )

( पडदा पडतो. )

## प्रवेश ६ वा.

पात्रें—विश्वासराव, कृष्णराव व मऱ्या.

स्थळ—कृष्णरावाचा देवडी दरवाजा.

( विश्वासराव देवडीवर असतां पडदा उघडतो )

**विश्वास०**- ( मऱ्यास ) कारे, कृष्णराव कोठें आहेत ?

**मऱ्या**—( मोठ्या ऐटीनें ) कौन, किसनराव ? बहार गये हैं.

( विश्वासराव आंत जाऊं लागतो. )

**मन्या**-( त्याला मागें फिरवून ) ए, अंदर मत् जाव.

**विश्वास०**-( स्वगत ) काळाचा सपाटा किती विलक्षण आहे ! ह्या ठिकाणीं मला मज्जाव व्हावा काय ? असो, कांहीं हरकत नाहीं; ह्या कुत्र्याच्या तोंडावर भाकरीचा तुकडा टाकल्या शिवाय ह्याचं भुंकणं थांबणार नाहीं. ( खिशांतून रुपाया काढून ) ये लेव तुमकूं. ( रुपाया देतो. )

**मन्या**-( रुपाया घेऊन मोठ्या गरिबीनें ) असे या बाजूनी जा; तकड हायेत आमच ह्माराज.

( विश्वासराव कृष्णरावाच्या खोलीकडे जातो व कृष्णराव खोलींत बसला आहे असा पडदा उघडतो. )

**कृष्ण०**-( आपल्याशीं ) सुशिला तरी मोठी अतत्यागी बायको दिसते. लागलीच जीव देण्या पर्यंत तिची मजल येऊन ठेपली. मी फारच घाबरून गेलों. वेळेवर स्त्रिया काय करतील आणि काय नाहीं ह्याचा कांहींच नियम नसतो त्यांच्या जवळ अगदीं जपूनच वागलं पाहिजे; नाहींतर तेव्हांच नागिणी सारख्या उलटतात. जरी त्यांनां अबला ह्मणतात तरी पण अशा पातिव्रत्य भंगा सारख्या प्रसंगीं त्या पूर्ण सबला होतात यांत शंकाच नाहीं. मी जरा विश्वासरावाच्या विरुद्ध बोलल्याबरोबर माझ्या अंगावर अगदीं चवताळून आली; यावरून विश्वासरावावर

तिचं निर्मळ प्रेम आहे. आतां ही ह्या विश्वास–सर्प-धाच्या तावडींतून कशी सुटेल ती सुटो माझ्या कामांत यश येईलसं मला नाहीं दिसत. तरी पण असं खिन्न होऊन काय उपयोग जी एकदां प्रतिज्ञा केली ती केलीच; कितीही बिकट असली तरी ती शेवटास नेलीच पाहिजे, नाहींतर लोक माझी छीथू करतील. कृष्णरावा, अशा वेळीं धीर सोडूं नको. ही तुझी खास परीक्षेचीच वेळ आहे धीर धर.

( इतक्यांत विश्वासराव येतो. )

**विश्वास०**–( आपल्याशीं ) स्वारीचा नूर अगदींच बदलून गेला आहे. द्रव्य मदानं स्वारींवर पूर्ण अंमल केला आहे. ह्या वेळेस तो मजजवळ खुल्या अंतःकरणानं बोलेलसं दिसत नाहीं. पण काय उपयोग, वेळ बितली खरी! आडल्या वेळेला गाढवाचे सुद्धां पाय धरावे लागतात ते हे असे आतां मानापमान एकीकडे ठेऊन ह्याच्या जवळ बोललंच पाहिजे. कोणत्या ही गोष्टीचा निकाल लागावा हें उत्तम मुग्ध ठेवल्यास त्या पासून भयंकर प्रसंग गुदरतात. ( उघड ) कां कृष्णराव, आताशें अगदीं दर्शन सुद्धां देत नाहीं?

**कृष्ण०**–( एकीकडे ) आतां मात्र सावधगिरीनंच असलं पाहिजे. प्रत्यक्ष तोंडास तोंड होण्याचा प्रसंग आला खरा! ( विचार करून, रागानें ) पण ह्याला

आंत कोणीं सोडला ? मन्या तरी अगदीं मूर्ख आहे. आतां कशी तरी टाळाटाळ करून धींड एकदां परत लावलीच पाहिजे. ह्याच्या जवळ फार कावे-बाज पणानं वागलं पाहिजे. ( उघड ) आज इकडे कोणीकडे ?

**विश्वास**०–( आपल्याशीं ) गुलामाला एक प्रश्न विचा-रायला इतका उशीर आं ? ( उघड ) तुह्मी गांवा-हून केव्हां आलांत ?

**कृष्ण**०–( आपल्याशीं ) ह्यानं पेढी संबंधीं विचारलं तर काय सांगावं ? ( विचार करून ) तुझा माझा ह्या बाबतींत मुळींच संबंध नाहीं असं स्पष्ट सांगावं. छे: असं नको त्यापेक्षां पेढीशीं तुझा संबंधच नाहीं असं सांगावं हें बरं. ( उघड ) हा आतांच आलों.

**विश्वास**०–( भोळे पणानें ) पेढीच्या किल्या मज जवळ दिल्या असत्यात तर फार चांगलं झालं असतं. इतक्या दिवसांत खूपच विक्री झाली असती. मोठं मोठीं गिऱ्हाइकं माझ्या घरीं येऊन परत गेलीं. आपलं ह्या मुळें अतिशय नुकसान झालं. पण-( सिलाची आठवण होऊन रोंख बदलून ) मी पेढी-कडे गेलों तों कुलपावर सील !

**कृष्ण**०–( आपल्याशीं ) आतां मात्र ह्याला चांगलाच दरडावला पाहिजे ह्मणजे पुन्हां पेढीची गोष्टच काढ-

णार नाहीं. ( उघड ) तुह्मी शुद्धीवर आहां का? कसली पेढी आणि आहे काय?

विश्वास०—( आपल्याशीं ) अरे चोरा; मलाच उलट्या गोष्टी सांगतो आहेस? ह्याचें योग्य शासन दिल्या शिवाय देव कधींच राहणार नाहीं समजलास? ( उघड ) मला वाटतं आपलंच भान सुटलं आहे.

कृष्ण० हं संभाळा; जीभ आटपा; पैशांच्या बाबतींत असला हलकटपणा काय उपयोग? माझ्या पेढीशीं तुमचा काय संबंध आहे? नसतं कुभांड रचून माझी बेअब्रू करूं पाहतां होय?

विश्वास० ( आपल्याशीं ) हा घातक्या; ह्या नीच कर्मांचीं फळं भोगतांना कळेल सुख काय आहे तें! नीचा, तूं आपल्या वळणावरच गेलास आं! सर्पाला दूध पाजलं तरी तो दंश करणारच! ( उघड ) काय? माझा पेढीशीं संबंध नाहीं? वः फार शहाणे दिसतां. अवदसा आली वाटतं? बाप पैसे देत नव्हता ते उगीच? ह्याच गुणानं; ठीक आहे, आज पर्यंतच्या स्नेहाचा चांगला परिणाम केलास! ज्याचं खातो आहेस त्याला दुवा देण्याचं एकीकडेच राहिलं आणि शिवाय असा विश्वासघात! अरे, तुझा आणि माझा कसा स्नेह होता आणि नुसत्या पैशाच्या मोहानं इतका धुंद होऊन त्याची तुला आठवण देखील राहूं नये? अधमा, माझ्या गळ्याची शपथ

वाहून हें घोर कर्म करण्यास प्रवृत्त झालास? त्यापेक्षां जन्मास आलास त्यावेळींच कां मेला नाहींस? निर्दया, मातेच्या पोटीं जन्म घेऊन तिला व्यर्थ शिणविलीस! लहान पणीं गाढवाचीं पोरं गोजीर वाणीं असलीं तरी कान मोठे झाल्यावर तीं गाढवाचंच रूप दाखवणार. अरे, लहानपणा पासून तुझ्यावर माझं निर्मळ प्रेम असतां त्यांत तूं माती कालवावीस ना? तुला मी आपल्या धाकट्या भावा-प्रमाणें समजत होतों ती भाऊबंदकी चांगली साध-लीस. मी तुला पहिल्या प्रथम सांगितलं, कृष्णराव आपण हा धंदा करण्यास तयार झालों आहों पण पैशांशीं संबंध आहे मन बदलेल. त्या वेळेस मला शास्त्रार्थाच्या गोष्टी सांगितल्यास आणि आतां ह्या पशुवृत्तिचा कां अंगिकार केलास? त्या वेळचे तुझे ते विचार एकदम कसे मावळले! माझ्या जवळ मोठ्या प्रेमानं बोलणारा कृष्णराव तो तूंच काय? अरे रे! कृतघ्ना ह्याचीं फळं तूं चांगलींच भोगशील समजलास? अरे, तुझ्या बापाचा आमच्या जवळ किती वर्षं व्यववहार आहे, पण तुझ्या ह्या कृतीनं त्याला आतां तोंड सुद्धां दाखवितां येणार नाहीं! मूर्खा आपल्या बेच्याळीस पिढ्यांचा चांगला उद्धार केलास! धिःकार, धिःकार! जन्मास येऊन हें शत-

कृत्य करण्यापेक्षां रेड्याच्या जन्मास येतास तर नांगराच्या चांगला उपयोगीं पडला असतास !

कृष्ण०–( आपल्याशीं ) मोठ्या उपदेशाच्या गोष्टी सांगतो आहे. माझ्या आड आला नसतास तर मी देखील अशा रीतीनं वागलों नसतों. पण तुझं नशीब फिरलं त्याला मी काय करूं? जसं करावं तसं भोगावं. ( उघड ) फारशी जीभ चुरचुरते आहे? भाऊबंदीचं नातं जोडून माझ्या पेढीवर हक्क सांगायला पाहतो आहे भामट्या कुठला ! चल हो चालता येथून कां देऊं धक्की ?

विश्वास०–( संतापून ) किल्या देतोस कीं नाहीं ?

कृष्ण०–मुकाट्यानं चालता हो.

विश्वास०–( आपल्याशीं ) ह्याच्या जवळ अधीक बोलून शोभा करून घेण्यांत तात्पर्य नाहीं. ( उघड ) मला पैशांबद्दल मुळींच दुःख होत नाहीं; पैसा पैसा ह्मणजे तूं काय समजला आहेस हातचा मळ आहे परंतु ह्या कृष्ण कपटानं तूं मात्र नरकांत पडशील ह्याबद्दल मला अतिशयच दुःख होत आहे ! या पुढें हें तुझं कृष्ण मुख माझ्या नजरेस कधींहि पडूं नये येवढीच परमेश्वरा जवळ प्रार्थना आहे ! शेवट फार नामी केलास ! ( जातो. )

कृष्ण०-( गेलासें पाहून ) अरे, अझून तरी ह्या कृष्णरावाला कोठें ओळखलं आहेस? संभाळून रहा ह्मणजे झालं. हा कृष्णराव आहे कृष्णराव समजलास ?

( मिशीवर पीळ देत देत जातो. )

( पडदा पडतो. )



# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला.

पात्रें–कृष्णराव.

स्थळ–कृष्णरावाची खोली.

( कृष्णराव बसला असतां पडदा उघडतो. )

कृष्ण०–( आपल्याशीं ) दुःखा अंतीं सुख हा न्याय अगदीं बरोबर आहे. नीचावस्थेंतलि सर्व दुःखं अनुभाविल्या नंतर उच्चावस्था प्राप्त होऊन त्यांत होणारीं सुखं फारच महत्व पावतात. मनुष्यस्वभावच असा आहे कीं, त्याला जी स्थिति प्राप्त होते तींत होणाऱ्या सुखांची त्याला परवा न वाटतां, त्यास जीं दुःखं ह्मणून वाटत असतात त्यानींच त्याचं मन अगदीं व्यग्र करून सोडलेलं असतं. मिळून मनुष्य-स्वभावांत नेहमीं दोन स्थितींची तूलना सारखी चाललेली असायची. ज्या स्थितीची तो इच्छा करतो ती त्यास मिळतांच फार सुख झाल्याचं भासतं मात्र पण ही स्थिति निरंतरची नव्हे. जन्मापासून एकाच स्थितींत असलेल्या मनुष्याचं मन स्वस्थ नसतं त्याला त्यापेक्षां उच्चस्थिति प्राप्त होण्याचा हव्यास लागतो; असं असून त्याला ती प्राप्त न झाली तर तो स्वतःला कर्महीन असंच ह्मणून घेतो व नीच

स्थितींतून उच्चस्थितींत गेलेला मनुष्य आपणास भाग्यवान समजतो. खरोखर मला माझ्या पूर्वींच्या स्थितीची आठवण झाली ह्मणजे मोठं नवल वाटतं! आणि त्या बरोबरचं हल्लींच्या सुखाची कल्पना मनांत येऊन आनंदानं भरून जातों. काय आमचे आण्णा! एक पैसा सोडायचे नाहींत! पण त्यांनीं निदान असा तरी विचार करायला पाहिजे होता कीं, मुलगा आतां मोठा झाला पैसे मागितलेन तर द्यायला हरकत नाहीं; पण ही कल्पना सुद्धां त्यांच्या मनाला शिवली नाहीं! मी कांहींही कृत्य केलं तरी ते मला मूर्ख ह्मणायला राह्यचेच नाहींत; कुठें जायची तयारी केली कीं, त्यांचा प्रश्न व्हायचाच! मला त्या स्थितीचा फारच कंटाळा आला होता पण परस्वाधीन; काय करणार? दुसऱ्याच्या ओशाळगतींत राहणं मला मुळींच पसंत नव्हतं पण हें पैशाच्या स्वाधीन! जवळ पैसाच नसेल तर आपल्या मर्जी प्रमाणं वागण्यास कसं सांपडावं? नको, नको ती स्थिति! माझ्या जवळच्या पैशाचा आमच्या आण्णांना वास आल्या बरोबर ते लागलेच माझ्या तंत्रान वागायला लागले. त्यांनीं आपल्या तिजोरीच्या किल्या माझ्या स्वाधीन केल्या आणि सर्व व्यवहार मलाच पाहायला सांगितला; पण त्यांच्या व्यवहाराची जरूर आहे कुठे? मला कोणत्याही गोष्टीचं न्यून उरलं

नाहीं. माझ्या सारखा भाग्यवान विरळाच सांपडेल! आतां विश्वासरावाची ऐट माझ्या पुढें मुळींच चालणार नाहीं. पैसा मिळण्याचा योग आला ह्मणजे कसा अचानक मिळतो! तरी मनुष्याची कर्तबगारी पाहिजेच! एखाद्या नेभळटाचं हें काम नाहीं! ह्या वेळेस माझं संधान जरा चुकलं असतं तर हें वैभव कधींच मिळालं नसतं! अक्कले पुढें पंचमहाभूतांचं देखील कांहीं चालत नाहीं मग पैशाची काय कथा! ह्या जगांत सर्व सुखी कोण असेल. तो असो! माझी पैशाची बाजू जरी धड आहे तरी दुसरी बाजू मात्र अजिबात लंगडी आहे! इतके दिवस त्या सुशीलेचं मन वळवण्याचा प्रयत्न करतों आहे पण तिचा एकच हट्ट! मी होऊन विनंति करीत असतां ती नाकारते आहे; तिच्यासारखी हतभागी स्त्री तीच! माझ्या सारखा पति मिळायला जन्मच्या जन्म तपश्चर्या कराव्या लागतील हें हिला कळूं नये? अगदीं मूर्ख आहे. किती तऱ्हेनं तिला समजवा तरी तिचं आहे तेंच खरं. वशीकरणास दाम, दंड व भेद हे तीन उपाय आहेत. ह्यां पैकीं पहिल्या दोघांचा पराभवच झाला. आतां शेवटचा उपाय योजणं भाग आहे. मी पैसा पुष्कळ मिळवला येवढ्यानंच माझं अवतारकृत्य संपलं नाहीं; त्या पैकीं हा एक भाग झाला; परंतु मुख्य भागास आरंभच आहे. तो

जेव्हां तडीस जाईल तेव्हां मात्र मी धन्य होईन ! आतां त्याच उद्योगाला लागलं पाहिजे. ( जातो. )

( पडदा पडतो. )

## प्रवेश २ रा.

पात्रें–सुशिला व मऱ्या.

स्थळ–कृष्णरावाची खोली.

( सुशीला बसली असतां पडदा उघडतो. )

**सुशिला**–( दुःखानें ) परमेश्वरा, तुला माझी दया नाहीं कां येत ? मी तुझा असा अपराध तरी कोणता केला आहे ? हा दुष्ट माझे विनाकारण हाल करतो आहे. माझ्या मना प्रमाणं ज्या दिवशीं घडून येईल तोच सुदीन ! देवा, तिकडे ही बातमी जर समजली असली, तर काय स्थिति झाली असेल बरं ! बातमी फार करून कळली नसेल कारण, कळली असती तर मला इथें दुःखांत राहावं लागलंच नसतं ! माझ्या कर्मांत काय काय खेळ लिहिले आहेत हे एका परमेश्वरालाच ठाऊक ! ह्या अभागी मुळं तिकडे मात्र चैन नसेल. दुसऱ्याला दुःख देणारी जी मी तिनं वांचून तरी काय करायचं आहे ! परमेश्वरा ह्या दुष्टाच्या हातून माझी सुटका न करशील तर मी प्राण दिल्या शिवाय कधींच राहणार नाहीं. त्या

मेल्याचे नुसते शब्द सुद्धां मला ऐकववत नाहींत ! पण अदल्या जन्मीं काय पाप केलं होतं तें ह्या चांडाळाचं थोबाड पाह्यची माझ्यावर वेळ आली ! मला इथे आल्याला उणे पुरे आठ दिवस झाले, पण तिकडलं कांहींच वर्तमान कळलं नाहीं. जीव कसा तिळ तिळ तुटतो आहे ! माते जगदंबे, तिकडे सुखी ठेव येवढंच माझं पदर पसरून मागणं आहे. किती मनोहर स्वरूप तें ! डोळे तरी किती पाणीदार ! ती हंसत मुख मूर्ती पाहून डोळ्याचं अगदीं समाधानच होतं. तिकडची आठवण झाली कीं कांहींच सुचें-नासं होतं बाई ! पण आमच्या सुखाच्या आड हा ब्रह्मराक्षस कुठून आला ! आतां ह्याला तोंड तरी काय काढावी बाई ? ह्या काळ्याच्या हातून माझी कशी सुटका होईल ! ( विचार करून ) हो; असंच करावं मी अशा प्रसंगांत आहें, ह्यांतून सोडवणार आपल्या शिवाय दुसरं कोण आहे ? असं एक पत्र लिहून मन्याजवळून तिकडे पोंचवावं. पत्र पाहून तिकडून स्वस्थ बसणं मुळींच व्हायचं नाहीं.

( इतक्यांत मन्या येतो )

**मन्या**-( प्रवेश व रामराम करून ) बाईसायेब, ह्माराज इचारत्यात तुमास ज्येवायचा न्हाय का ?

**सुशिला**-( कपाळास आठ्या घालून ) कसलं बाबा जेवण आणि खाण ! मी इथें आहें तिथ पर्यंत अन्नाला

शिवणार सुद्धां नाहीं समजलास? हें बघ, मी एक तुला काम सांगणार आहें; करशील का?

**मन्या**-मना तुमची समदी यवस्था ठ्येवाया सांगतली हाये आन आस काय इचारता बाईसायेब?

**सुशीला**-अरे, मी तुला निराळंच काम सांगणार आहें. तें कुणाला सुद्धां कळतां उपियोगी नाहीं. कुणाला सांगणार नाहीं असं कबूल करीत असलास तर सांगत्यें.

**मन्या**-घरातल्या घरामंदीच हाय ना?

**सुशीला**-नाहीं; दुसरीकडचंच आहे. तात्यासाहेबांकडे धाडायचा आहे तुला.

**मन्या**-त्ये तर आपल्श्या बाच्यान बी व्हनार न्हाई. (कानावर हात ठेवतो) ह्मारांजांना कललं तर लात मारुनशान मला घेतील की घालवून!

**सुशीला**-अरे, असा भितोस काय? तुझ्या धन्याला कळवूं नकोस ह्मणजे झालं.

**मन्या**-न्हाई; आपल्याच्यान नाय व्हनार. जातोया कुनचाल्योक त्या भानगडीत पड़ाया!

**सुशीला**-अरे, हें बघ, मी तुला चांगलं बक्षीस देईन; पण माझं येवढं काम कर.

**मन्या**-काय, बक्षिस व्हय? (आपल्याशीं आनंदानें) आता मातर आपल डोल चकारल; तोंडाला मस

पानी सुटतया आपल्याला काय ? धन्याला कलवलां न्हाई मंजी झालां. म्हाराज काय मना बगाया येतात थोडच ! असा लाग नाई आपल्याच्यान टाकववत ! ( उघड ) बाईसायेब, ब्येगी बोला काय काम हाय त्ये.

सुशीला–सांगूं कां ? पण कुण्णाला सुद्धां कळतां उपयोग नाहीं बरका ?

मन्या–व्हय व्हय; बाईसायेब, कोनासबी न्हाई कलवनार.

सुशीला–थांब तर जरा. ( दौत सोधूं लागत्ये )

मन्या–( ती कांहीं सोधत्ये आहे असें पाहून ) बाईसायेब, तुमी काय बगताया ?

सुशीला–अरे, दौत लेखण आहे का कुठे ?

मन्या–( धांदलीनें ) दौत ? दौत व्हय ? ( दौत काढून ) ही घ्या. ( दौत व लेखण पुढें ठेवतो )

सुशीला ( पत्र लिहून बंद करून ) हं हें घे पत्र आणि तात्यासाहेबांचे—

मन्या–तात्यासायबांच ? कोन इसवासराव व्हय ?

सुशीला–( हंसून आपल्याशीं ) किती हुशार आहे पण ! ( उघड ) होय; त्यांनां हें दे नेऊन. दुसऱ्या कोणाच्या देखत देऊं नको हो ? जा; पण लवकर ये.

मन्या–( पत्र घेऊन ) व्हय व्हय; हा आलुच बगा. ( जातो. )

**सुशीला**–मन्या येई पर्यंत नुसतं बसून तरी काय करायचं आहे? तुळशीची पुजा करीत बसावं.

( जाते )

( पडदा पडतो )

## प्रवेश ३ रा.

**पात्रें**–सोन्या व मन्या.

**स्थळ**–विश्वासरावाचा दिंडीदरवाजा.

( सोन्या दिंडीदरवाज्यावर उभा आहे असा पडदा उघडतो. )

**सोन्या**–हा कोन बर हकड येतोया?

( इतक्यांत मन्या येतो. )

**मन्या**–( प्रवेशकरून ) राम राम सोनबा. ( राम राम करतो )

**सोन्या**–राम राम मन्यादा. हकड कुट पावत?

**मन्या**–हकड तुमच्याच कड आलोया.

**सोन्या**–आमच्याकड? शेः उगाच खोट कशापाई सांगता?

**मन्या**–आइच्यान, तुमच्याच जवल काम हाये. ( पत्र दाखवून ) ह्ये बगा, ह्यां पतीर तुमच्या इसवासरावाना द्यायाचां हाये.

**सोन्या**–मन्यादा, कुनीर दिलां ह्यां?

**मन्या**–अर त्यो जनूभट न्हव का जनूभट त्याच्या ल्योकीनी दिलं हाये.

**सोन्या**–आन् ल्येका ती तुलार कुट घवसली ?

**मन्या**–अव घवसली कसली ? आमच्या धन्यानी तिला आपल्या घराला आनली हाये. त्याच्या मनामंदी तिला करायची हाये कारबारीन. पन तिच्या कुट मनात हाये ! तुमाला काय सांगू सोनबा, लई गमत; आक्षि हुंदक घेउ घेऊनशान रडतीया. तिच्या मनामंदी तुमच्या धन्याशी लगन लावायच हाये आमचा धनी न्हाई तिच्या मनास येत; त्याला अक्षि श्या घेत्ये बगा.

**सोन्या**–अव, आमच धनी तसच हायेत. किति झाल तरी आमच्याच धन्याच्या पैक्यावर येवढ्या मौजा चालल्यात तुज्या धन्याच्या ! तुजा धनी अगदी येडा हाय बग. जर तिच्या मनामंदी तुज्या धन्याशी लगन लावायच न्हाई आन आमच्या धन्याला ती खुस झाली हाये तर तुज्या आन आमच्या धन्याच ह्या पायी भांडन व्हईल.

**मन्या**–अव, व्हईल काय ? परवाच्या रोज लई भांडन झाल बगा. अगदी हात घाईवर आल व्हत दोग. पन तुमचा धनी चटक्यान निसटला. त्ये न्हाउद्या अदुगार ह्यां पतार द्या त्येना. ( पत्र देऊन ) आत

जातो ह्मनतो या; चटक्यान घ्या हां ? रामराम

( रामराम करून जातो. )

सोन्या–रामराम जाव तुमी. ( रामराम करतो व पत्राकडे पाहून ) आतां धनीसायबाना न्येउनशान द्यावां. ( जातो. )

( पडदा पडतो. )

## प्रवेश ४ था.

पात्रें–सुशीला व कृष्णराव.

स्थळ–खोली.

( सुशीला बसली असतां पडदा उघडतो. )

सुशिला ( स्वगत ) पूर्व जन्मीं माझ्या कडून काय पातक घडलं असेल तें असो ! त्याचींच फळं ह्या जन्मीं मला भोगावीं लागत आहेत; मी अशीच कोणाच्या प्रेमांत ताटातूट केली असेल, ह्मणूनच ह्या मेल्या कृष्णरावासारखे काळपुरुष आमच्या प्रेमांत माती कालवायला तयार झाले आहेत ! परमेश्वरा, मजकडून कांहीं अपराध झाला असला तर त्याची मला क्षमा कर ! मागच्या जन्मांत मी काय पातक केलें ह्याची मला आठवण नाहीं; पण हा प्रसंग आला त्या मुळं मला आपलं वाटतं ! देवा, कांहींही असलं तरी आतां मला पदरांत घे ! तूं जें जें मनांत

आणशील तें तें केल्याशिवाय तूं कधींच राहणार नाहींस हें मला पुरतं ठाऊक आहे. सर्वांचा सांभाळ करणारा तूंच आहेस; सगळ्यांचं जीवनच तूं; असं असून मी अभागी तुझी अशी नावडती कशी झाल्यें ? देवा, मला ह्या संकटांतून सोडव, नाहीं तर हे प्राण मला ठेऊन काय करायचं आहे ? ( साशंक मुद्रेनें थोडें थांबून ) पण आपला आपण प्राण द्यायचा ह्मणजे सुद्धां मोठं पापच ! आतां काय करावं ? मला तर सुचतच नाहीं बाई !

( इतक्यांत कृष्णराव येतो. )

कृष्ण०–( प्रवेश करून स्वगत ) हिच्या मुखचंद्राकडे पाहतांच हृदय कसं उचंबळून जातं ! चंद्रोदयानं समुद्रास आनंदाचं भरतं येऊन तो आपल्या लाटारूपीं अवयवांस यथेच्छ बागडूं देतो त्या प्रमाणं माझी स्थिति होऊन जाते. हस्तादि अवयव स्वच्छंदानं बागडण्याची इच्छा दर्शवूं लागतात, पण उपयोग काय ? खरोखर, माझ्या सारखा दैवहीन मनुष्य ह्या जगावर कोणीच नसेल ! हिची किती ही समजूत केली तरी ती मिळून माझी डाळच शिजूं देत नाहीं. ( उघड ) सुशिले, त्या विश्वासरावाचा नाद सोडून दे; मी सांगतों ती गोष्ट ऐक; त्यांतच तुझं हित आहे. कांहीं विचार कर.

सुशिला–( रागानें ) माझ्याशीं एक अक्षर सुद्धां बोलूं नकोस पुन्हां पुन्हां जीभ लांब करून बोलायला लाज नाहीं वाटत ?

कृष्ण०–प्रिये, तूं माझ्याशीं लग्न लावशील तर मी खरोखर धन्यच होईन. आपल्या दोघांचा जोडा फारच नामी दिसेल. असा योग आणूं ह्मणून येणार नाहीं, तो अनायासें आला आहे; पण तूं आपला हट्ट सोड. ( तिला धरण्यास जातो )

सुशिला–( हातास हिसडून चवताळून ) चांडाळा, परस्त्रीला हात ? मेल्या, मी तुझ्या धाकट्या बहिणी प्रमाणें आहें. भलभलतं बोलशील तर तुझी जीभच झडेल समजलास ? पाप्या, पतिव्रतेचा छळ केल्याचा परिणाम तुला ठाऊक नाहीं ? ह्या पापाचरणाचे झाडे देतांनां कळेल सुख ! बऱ्या बोलांनीं मला घरीं पोंचव.

कृष्ण०–( स्वगत ) हिला गोडीनं सांगून ही ऐकणार नाहीं; चांगली दहशतच घातली पाहिजे. ( आपली छोटी तरवार तिला न दिसे अशी घेऊन उघड ) हें पहा, इतका वेळ मी तुला सोईनं सांगून पाहिलं पण आतां मात्र तुझं नशीब फिरलं समज.

सुशिला–( रागानें ) तुझ्या माकडाच्या हातून माझं काय होणार आहे ? माझी अनिष्ट ग्रहदशा आहे तों पर्यंतच ह्या तुझ्या चेष्टा ! पण देव जागा आहे हें पुरतं लक्षांत ठेव.

**कृष्ण०**–( रागानें ) हं खबरदार, जास्त बोलूं नकोस. मी विचारीन तेवढ्याचं उत्तर दे.

**सुशिला**–जा मेल्या, तुला काय द्यायचीं आहेत उत्तरं ?

**कृष्ण०**–माझ्याशीं लग्न लावायला तयार होतेस कीं नाहीं ? बोल.

**सुशिला**–( स्वगत दुःखानें ) नको नकोत ते शब्द सुद्धां ऐकायला नकोत ! ( उघड ) मेल्या, हे शब्द बोलतांना जीभ कां गळून पडली नाहीं ?

**कृष्ण०**–( तिचा हात धरून ) बोल, लग्न लावतेस कीं नाहीं ?

**सुशिला**–( धडपड करून हात सोडून स्वगत ) हाय ! हाय ! देवा, आतां मात्र मला आशाच उरली नाहीं ! तूं देखील माझ्यावर फिरलास ना ? आतां मी काय करूं ! हा मेला चांडाळ, पशू सारखा अंगावर धाव धाऊन येतो आहे ! देवा, धांव लवकर ! ह्याच्या हातून मला सोडव !

**कृष्ण०**–( तरवार उपसून ) जर कबूल करणार नाहींस तर ह्याच तरवारीनं तुझे तुकडे करून टाकीन; ह्याचा विचार कर.

**सुशिला**–( निराशेनें ) खुशाल ! खुशाल ! एका गरीब गाईचा अन्यायानं गळा कापण्याचा तुला पुरुषार्थ वाटत असेल तर ती तरवार ( मान पुढें करून )

ह्या मानेवर खुशाल चालव आणि स्त्रीहत्येचं पातक घे आपल्या बोडक्यावर !

**कृष्ण०**–( हिंमत न होऊन स्वगत ) छेः माझा हातच धजत नाहीं ! ( तरवार टाकून ) ही कबूल होण्याला काय युक्ति योजावी ( विचार करतो )

**सुशिला**–( तो मारीत नाहीं असें पाहून स्वगत ) ह्या मेल्यानं मला यमाकडे पाठवलं असतन तर फार चांगलं झालं असतं ! आतां ह्या जगांत राहून काय करायचं आहे ? ( उघड ) मेल्या, तूं मला मारीत नाहींस तर मीच जाऊन जीव देत्यें बघ. ( जाते )

**कृष्ण०**–( घाबरून ) सुशिले, नको नको. थांब, थांब. ( तिच्या पाठी मागें जातो )

( पडदा पडतो. )

अंक ३ रा समाप्त.

# अंक ४ था.

## प्रवेश १ ला.

पात्रें—विश्वासराव व सोन्या.

स्थळ—विश्वासरावाचा खाजगी दिवाणखाना.

( विश्वासराव बसला असतां पडदा उघडतो. )

विश्वास०—( स्वगत ) मी आजपर्यंत केलेल्या उपकारांची फेड कृष्णरावानं चांगलीच केलीन ह्मणायची! हा माझ्या विरुद्ध वागेल अशी माझी कल्पना देखील नव्हती. शास्त्रीबोवांनीं सर्व गोष्टी अगदीं खऱ्या सांगितल्या. हा मी पहिल्यानेंच कृष्णरावाच्या नादीं लागलों नसतों तर किती चांगलं झालं असतं? त्याच्या मनांत ही गोष्ट कोणी भरवली असेल तीं असो. मला पूर्ण खात्री होती कीं, कृष्णराव असं करणार नाहीं; इतकंच नव्हे तर काल त्याचं आणि माझं उघड उघड बोलणं होऊन त्यानं मला अगदीं झिडकारून लावलन तरी तो तसं करणार नाहीं; त्यानं ही माझी थट्टाच केली असेल असं सुद्धां वाटतं. ( विचार करून ) छेः विश्वासा, अरे अजून तरी शुद्धीवर ये? नाहीं; ह्यापुढें मी कृष्णरावाच्या स्नेह-पाशांत गुंतेन तर सर्व जग मला हंसेल. छे छे आतां त्या कृष्ण-वदनाकडे बघण्याची सुद्धां इच्छा होऊं नये. जो

दुसऱ्याचे उपकार न स्मरतां त्याच्यावरच उलटतो त्याला मनुष्य तरी कोण ह्मणेल? एखाद्या पशूला जर खायला घातलं तर त्याची तो ओळख ठेवतो पण हा कृष्णराव चांगला माणसासारखा माणूस असून त्यानं असं क्रियानष्ट कां व्हावं! कांहींच तर्क चालत नाहीं! बरं; जशी प्रभूची इच्छा! मनुष्याच्या हातांत काय आहे? कर्ता करविता तोच. ( जरा विचार करून ) सगळ्याच बाजूंनीं पाहिलं तर माझं नशीब वावटळींत गोते खाऊं लागलं आहे खरं! ही साडेसाती केव्हां सरेल ती सरो! त्या सुशीलेचं समुद्रावर दर्शन झाल्यापासून आजपर्यंत तिची भेट नाहीं व कांहीं वर्तमानही कळत नाहीं यामुळें मन अगदीं उद्विग्न आहे! जेवतां खातां, बसतां उठतां सारखी तिची मूर्ति डोळ्यापुढें दिसते आहे! एकदां लग्नाचा योग लवकर जुळून आला ह्मणजे बरं. तिकडे तिला सुद्धां चैन नसेल व मजबद्दल तिच्या मनांत कुतर्क येऊन मला ती दोष तर लावीत नसेल ना? आपल्या वरून जग ओळखावं. जी माझी स्थिति तीच तिची असणार ह्यांत शंकाच नाहीं! सोन्याला आज पाठवीन उद्यां पाठवीन असं ह्मणतां ह्मणतां दहा दिवस होऊन गेले!

( इतक्यांत सोन्या येतो )

**सोन्या**–( प्रवेश व रामराम करून ) धनीसायेब, त्यो आन्नासायबांचा मन्या आला व्हता. आन त्येनी ह्यां पतीर दिलं हाय हानून. ( पत्र देऊन ) आन त्यो ह्मनला जनूभटजींच्या ल्येकीन दिल हाये.

**विश्वास**०–( पत्र वाचून दिलगिरीनें स्वगत ) प्राक्तन माझं! दुसऱ्याला तरी दोष देऊन काय होणार? एका संकटांतून पार पडण्याच्या विवंचनेंत आहें तोंच दुसरं पुढें येऊन ठेपलं! बुडत्याचा पाय खोलांत ह्मणून ह्मणतात तें अक्षरशः खरं आहे. ह्या कृष्ण्यानं पेढीच्या संबंधांत गैरविश्वास केला हा तर अपराध क्षुल्लकच; परंतु जिच्या करितां मी रात्रंदिवस झुरतों आहें व जिच्यावर मी आपल्या प्राणाहूनही अधिक प्रेम करतों, तिला ह्या कृतघ्नानं छळावं हा किती भयंकर अपराध! अरे बेरडा, ज्याचं आजपर्यंत खाल्लंस व पुढेंही खाणार त्याच्यावर सर्वस्वी फिरलास काय? ठीक आहे; आतां मात्र तूं क्षमेस पात्र नाहींस. अशीं काळीं कर्म तुझ्यांत भरलीं आहेत अँ? तुझं नांव ह्या कर्मांनीं तूं सार्थ केलंस. तूं पुढें असा निपजशील असं तुझ्या आईबापांना अगोदरच कळलं होतं कीं काय कोण-जाणें! केवढं हें धाडस! अरे, जी केवळ माझा प्राणच अशा स्त्रीवर तूं वाकडी नजर ठेवावीस ह्यापेक्षां नीच कर्म तुझ्या हातून आणखी काय होणार? बेश-रम मनुष्या आपल्या पितरांस तूं खरोखरी नर्कांत

लोटून त्यांस अनंत दुःख भोगण्याची पाळी आणि-लीस ! हरामखोरा, तूं माझ्याजवळ भावाप्रमाणें वागत होतासना ? तुला पैसे मिळवून पोटाची खळगी भरा-यची होती तर त्याला माझी मुळींच हरकत नव्हती. अरे नीचा, ती तुझी भावजयना ? अरे निदान मि-त्राची स्त्री ना ? मग हें पापकर्म करण्यास तुला कसा धीर झाला ? असा अंध कसा झालास ? तूं आप-ल्याला संपत्तिवान समजत असशील तर खुशाल समज पण हें नरकाचं साधन कां करून घेतलंस ? तूं न्यायान्यायाकडे मुळींच लक्ष दिलं नाहींस काय ? शाबास ! शाबास ! तूं हें एक पहिल्या प्रतिचं उदा-हरण जगाला घालून दिलंस ! तूं बाहेरून वर्तनानं किती साफ दिसत होतास आणि आतां पाहतों तों तूं कुविचार व दुर्वर्तन ह्यांचा मूर्तिमान पुतळाच बनला आहेस ! अधमा, ह्यापेक्षां खरोखर एखादा पशू बरा; पशूच्या भूषणांपैकीं शिंग आणि शेपटी हींच कायतीं तुला कमी आहेत ! ह्या असल्या नरपशूंनां जें शासन करावं तें थोडंच ! गाढवावर उलटे बसवून ह्यांची धींड काढली तरी ह्यांच्या काळजाला यत्किंचितही घाम येणार नाहीं ! खाटका, तूं वाटेल तेवढा मला त्रास द्यायचा होतास पण त्या गाईला कां छळतो आहेस ? ( विचार करून ) बरं; आलेल्या भोगास सादर झालं पाहिजे ! तिची सुटका होण्याला

काय युक्ति योजावी ? तिनं माझ्यासाठीं कंठशोष केला असेल व पत्र पोंचतांच मी तिची सुटका ताबडतोब करीन ह्या आशेवर ती असेल ! ( विचार करून ) हं हेंच उत्तम; सोन्याबरोबर गुप्त रीतीनं पत्र द्यावं कीं ह्याच्या बरोबर निघून ये ह्मणजे ती येईल. ( संशयानें ) पण सोन्याचा तिथें शिरकाव कसा होईल ! ( सोन्यास ) सोन्या, तो पत्र घेऊन आला होता तो कोणरे ?

**सोन्या**—धनीसायेब, तो अन्नासायबांचा मन्या न्हवका ? तो लई चांगला मानुस हाये पन्—

**विश्वास०**—अरे पण काय ?

**सोन्या**—आँ, त्येला पैशाचा लई सोस कुनाचांबी काम असलां तरी त्येला पैस होवत !

**विश्वास०**—( हुषारी येऊन स्वगत ) सोन्याच्या तोंडून हें तरी बरं समजलं ( पत्र लिहून. उघड ) सोन्या, हें घे पत्र आणि त्या मन्याच्या मदतीनं सुशिलेला नेऊन दे, आणि तिला सांग माझ्याच बरोबर बोलाबलं आहे. मात्र इतकं लक्षांत ठेव कीं, ही गोष्ट अगदीं गुप्त रीतीनं केली पाहिजे. जर कोणाला कळली तर संभाळून ऐस. ( पैसे देऊन ) हे घे पांच रुपये. हे त्या मन्याला दे; ह्मणजे तुला तो मदत करील. मग तूं तिला बरोबर घेऊन लवकर ये.

**सोन्या**—( रामराम करून ) व्हय धनीसायेब. ( जातो )

विश्वास०-आतां सोन्या येईपर्यंत स्नान करून घ्यावं. ( जातो )

( पडदा पडतो. )

### प्रवेश २ रा.

पात्रें-विश्वासराव व जनूभट.

स्थळ-विश्वासरावाचा दिवाणखाना.

( विश्वासराव बसला असतां पडदा पडतो.)

विश्वास०-(स्वगत) पहा, काय चमत्कार आहे ! आठ दिवस होईपर्यंत ही गोष्ट मला कळूं नये ह्मणजे मोठं आश्चर्य आहे ! कृष्णरावानं तिला फारच छळलं असं ती पत्रांत लिहिते. ती तिची हकीकत वाचतांच रोमांच कसे थरथरून उभे राहिले ! त्या वेळेस इतका संताप आला होता कीं, त्या कृष्णराराला चांगलंच शासन करावं; पण आत्मसंयमन केलं. कारण, एकानं जरी गाय मारली तरी दुसऱ्यानं वांसरूं मारायला तयार होणं ह्मणजे वेडेपणाच. वास्तविक न्यायानं पाहिलं तर अशा गुन्हेगारास शासन करणं हें मानवी सामर्थ्या पलकिडे आहे ! फार झालं तर मनुष्य देहांत शासन करील परंतु ह्या नीच पुरुषांच्या अपराधाच्या मानानं तें फार कमी होईल. आपल्यामधें जी नर्कवासाची कल्पना आहे ती जर खरी असेल तर तें

शासन मात्र योग्य होईल. असल्या लोकांनां कृतकर्मांचा पूर्ण पश्चात्ताप झाला पाहिजे ! किती तरी लोकांना हें शासन मिळालं असेल तरी पण ह्या जगावरील असले अपराध करणाऱ्यांची संख्या कां हटत नाहीं ह्याचा उलगडाच होत नाहीं ! मनुष्यजन्मास येऊन आपलं कर्तव्य काय हें न ओळखणं ह्मणजे केवळ आपल्याच पायावर आपणच धोंडा पाडून घेण्यासारखं आहे ! हीं नीच कर्म करण्याची प्रवृत्ति होण्यास संगति कारण आहे ह्मणावं तर त्याच्या सत्यतेबद्दल मला संशय येतो. असलीं घोरकर्मं करण्याची कल्पना स्वभावतःच मनुष्याच्या मनांत येत असावी; कारण, हा कृष्णराव संगतीनं बिघडला ह्मणावं तर ह्याला अगदीं लहानपणापासून माझीच संगति आहे ! असं असून तो असलीं घोरकर्मं करितो व तीं नुसतीं ऐकण्याची सुद्धां मला भीति वाटते ! ह्यापेक्षां मनुष्य आपल्या पिढीच्या वळणावर जातो असं ह्मटलं तर बरं; कारण, आण्णासाहेबांचा जन्म तरी गोरगरीबांना लुबाडून आपला तळीराम गार करून घेण्यांतच गेला आणि त्यांचेच हे चिरंजीव ! मग काय विचारतां बापसेबेटा सवाई ! ह्या याच्या दुष्ट कृत्यांचा त्रास आह्मां तिघांनाच सोसावा लागत आहे ! ह्याबद्दल इतरांनां कल्पना सुद्धां नसेल ! त्या बिचाऱ्या जनूभटजींचा जीव सगळा सुशिलेवर असून त्या दोघांची

ह्यानं तुटातूट केल्यामुळं तो ब्राह्मण अगदीं वेडाऊन गेला असेल ! एकंदरींत फारच वाईट वेळ आली ! काय होईल तें पहावं ! प्रयत्न करणं मनुष्याचं कर्तव्य आहे मग यश येणं परमेश्वराधीन आहे !

( इतक्यांत जनूभट येतो. )

**जनूभट**–( प्रवेश व नमस्कार करून ) नमस्कार विश्वासराव, नमस्कार.

**विश्वास०**–( नमस्कार करून ) यावं जनूभट, या असे बसा.

**जनूभट**–अहो, आमचं भटाभिक्षुकांचं एवढं आगतस्वागत कशाला ?

**विश्वास०**–छे ! छे ! असं भलतंच काय बोलतां ? अहो, तुह्मीं वेदोनारायण आहां तुह्मांला नित्य प्रातःकाळीं वंदन करावं ह्मणून आपलं शास्त्र सांगत आहे, मग असं कसं ह्मणावं ? मी तर ब्राह्मण ह्मणजे पूज्य समजतों. पण आज इकडे कोणी कडे ?

**जनूभट**–( स्वगत ) आतां मात्र हयगय उपयोगीं नाहीं. ( उघड ) हे पहा, माझ्या सुशिलेला कृष्णरावानं फसवून नेली आहे आणि तो तिच्याशीं लग्न लावणार ह्मणून ऐकतों मुलगी अजून लहान आहे; शिवाय माझ्या मनांत त्या कृष्णरावांनां मुळींच द्यायची नाहीं. ( स्वगत ) लहानपणीं हीं मुलं एकेठिकाणीं खेळत असतांनां ती नेहेमीं ह्मणत असे ' विसूचा आणि सु-

शिलेचा किती सुरेख जोडा दिसेल ' पण तिला मी सांगावं, तू अगदीं वेडी आहेस; आपल्या भिक्ष्याच्या पोरीला तें ठिकाण कसं मिळेल ? ती लहानपणची ह्यांना कशाला आठवण असेल ! (उघड) मी ह्मणतों, आपल्या सारख्या भिक्षुकाच्या मुलीला एवढं मोठं स्थळ काय उपयोग ? एखादा वेद पठण करणारा गोरा भुरका मुलगा पाहून द्यावी असं मनांत आहे. (स्वगत) ह्यांनां लहानपणची देऊं कां आठवण ? छेः नको बोवा ! ( उघड ) तशांत कृष्णराव वाईट चालीचा मनुष्य आहे असं ऐकतों. तेव्हां—मी आपल्याकडे येण्याचा हेतू येवढाच कीं तुमचा आणि कृष्णरावाचा आहे स्नेह. स्नेहाच्या नात्यानं तुह्मी जर त्याला सांगितलंत तर तो तुमचं ऐकेल.

विश्वास०—हें बघा, अलीकडे बरेच दिवस त्याचा आणि माझा बरेपणा नाहीं.

जनूभट—असं नकाहो करूं ! माझं येवढं काम करा !

विश्वास०—माझं आणि त्याचं चांगलं नसलं तरी तुह्मांला तुमच्या मुलीबद्दल मुळींच काळजी नको.

जनूभट—हें पहा, येवढं गरिबाचं—

विश्वास०-तुह्माला मुळींच शंका नको.

जनूभट—नाहीं ह्मटलं, आपल्याला फुरसत होईल न होईल ह्मणून ह्मणतों हें आपलंच काम आहे असं समजून करायचं ?

विश्वास०—हें माझं कर्तव्यच आहे समजलांत ?

जनूभट—माझी थट्टा करतां कीं काय ?

विश्वास०—( स्वगत ) आतां ह्या ब्राह्मणाला कच्ची हकी-गत सांगितल्या शिवाय याच्या मनांतला संशय जाणार नाहीं. ( उघड ) जनूभटजी, आमची एकमेकांची प्रीति जडल्यामुळं मी तिजबरोबर विवाह करण्याचा निश्चय केला आहे.

जनूभट—( स्वगत ) ह्यांची लहानपणींच मैत्री होती तिची ह्यांनां आठवण आहे वाटतं ? परमेश्वराची कृपा. ( उघड ) अहो असं कसं होईल ? कुठे इंद्राचा ऐरावत आणि कुठे शामभटाची टटाणी ! तुह्माला मोठमोठ्यांच्या मुली सांगून येत असतां असं झालं तर तिचं भाग्यच ह्मणायचं ? ( स्वगत ) अशा वेळीं ती हयात असती तर तिला किती आनंद झाला असता ! परमेश्वरा असाच योग येऊंदे. ( उघड ) आतां सर्व काळजी तुह्मालाच ?

विश्वास०—तुह्मीं अगदीं स्वस्थ असा.

जनूभट०—मग मी जाऊं तर आतां ?

विश्वास०—हं खुशाल जा. तुह्मांला मुलींच काळजी नको.

जनूभट०—जातों तर. ( जातो )

( पडदा पडतो. )

## प्रवेश २ रा.

पात्रें—सोन्या व मन्या.

स्थळ—कृष्णरावाचा देवडी दरवाजा.

( मन्या देवडीवर उभा आहे असा पडदा उघडतो. )

**सोन्या**-( स्वगत ) ह्या परपंचात सदान्‌कदा दुख काढावां कतीक ? आज पंदरा रोज झाल, खर्चाया योक नासरीबी न्हाई. पाटीमांगं चार पौरांबालां खाया हायेत; आन्‌ ग्येलवनार मी येकलाच ! धनी बोलला हाये, का ह्योरच्या पयल्या तारक पासना तुला येईन बारा रुपये. मंग मातर वाईच चैन कराया घवसल. न्हाईतर बगा, ध्या रुपव्यामंदी चार मानसांचां पोटबी भागत नव्हतां! पन्‌ आमच्या धनीबी चैनी हाये तवा त्येनीं ह्या दोन मईन्यामंदी मना पांच रुपय वाडवलन. त्यो ह्यातारा धनी लई दवाड बगा! आमच धाकट धनी काईतरी मानसाची जान जानत्यात.

( इतक्यांत सोन्या येतो. )

**सोन्या**-( प्रवेश करून ) रामराम मन्यादा.

( रामराम करतो. )

**मन्या**-रामराम; ( रामराम करून ) का सोनबा बर हावना ?

**सोन्या**-आक्षि ठीक हाये. तुमाला योक कामगिरी हानलिया.

मन्या—पन् काई नंदर पडल तर—

सोन्या—घाबरूनशान् कशापाई जाताया? अक्षि समदी तयारी हाये बगा. ( रुपये वाजवतो. )

मन्या—( आवाज ऐकून आनंदानें स्वगत ) लईसां खुल-खुल वाजतांया? ( उघड ) सोनबा, कतीक हायेत कतीक?

सोन्या—म्हाप पाच हायेत पाच. ( पुन्हां वाजवतो. )

मन्या—द्या बगु हकड.

सोन्या—कामगिरी झाल्यावर मंग.

मन्या—( ऐटीनें ) दादा, मंग व्हईल आपली कामगिरी बरका? अदुगार होवत!

सोन्या—करा हात करा म्होर ( रुपये देतो. ) पन् कामगिरी कशी चपक्यान् झाली पायजेल?

मन्या—( रुपये घेऊन ) अगदीं ब्येगी; झालीच समजा; तर बोला आतां काय कामगिरी हाये ती?

सोन्या—हकड बगा, ह्यां पतीर द्येयाचां हाये त्या जनूभटाच्या ल्योकीला; पन् मना तकड न्येया होवां?

मन्या—चला या तर माज्या मांगून. ( पुढें चालूं लागतो ) या; असच नीट या.

सोन्या—चला; मी येतोच पाटीमागारून.

( दोघे जातात. )

( पडदा पडतो. )

## प्रवेश ४ था.

पात्रें–विश्वासराव, सुशिला व सोन्या.

स्थळ–विश्वासरावाचा खाजगी दिवाणखाना.

( विश्वासराव बसला असतां पडदा उघडतो. )

विश्वास०–( स्वगत ) हें जग मायेनं केवळ गुंडाळून ठेवलं आहे! ह्या मायेच्या पडद्यानं सत्यावर जणूं काय झांकणच पडलं आहे. मनुष्य आपल्याकडेच प्रत्येक गोष्टींत कर्तृत्व घेत असतो, परंतु सर्व फुकट आहे! कर्ता करविता काय तो एक परमेश्वरच! इकडे मी मनांत ह्मणतों आहें कीं, सुशिलेशीं लग्न लावीन; आणि तिकडे तो कृष्णरावही तिच्या प्राप्ती साठीं धडपडतो आहे; आतां ह्यापैकीं कोणा एकाच्या मना प्रमाणं झालं तर तें कर्तृत्व त्याचं असं कधींच ह्मणतां येणार नाहीं. परमेश्वरानं जशी योजना केली असेल तसंच होणार! असं असून मीच केलं असं ह्मणणारा मूर्खच समजला पाहिजे. तूर्त कांहीही असलं तरी मी मोठ्या काळजींत आहें कारण, जनूभटजींनां सांगितल्या प्रमाणं झालं तर ठीक आहे नाहींतर माझी फजीतीच होणार; कारण मनुष्याच्या तोंडांतून शब्द निघालेले त्याला खरे केलेच पाहिजेत; परमेश्वरा, तुझे संकल्प आह्मां मनुष्यांना आधींच कळते तर

फारच नामी झालं असतं! ह्या सर्व विश्वाची उत्पत्ति तूं आपलं मनोरंजन करण्या करितांच केली असावीस! ह्या तुझ्या खेळांत ज्याचं त्याचं पाप पुण्य ओळखून त्यांना योग्य स्थिति देतोस हे तुझे किती तरी उपकार आहेत! मी तर संकल्पच केला आहे कीं, सुशीलेशीं विवाह लावीन परंतु तुझी इच्छा काय आहे? तूं न्यायी आहेसच!

( इतक्यांत सोन्या व सुशीला येतात )

**सोन्या**–( प्रवेश करून सुशिलेस ) या बाईसायेब, अशाच माज्या पाठीमाघारून या.

**सुशिला**–( स्वगत ) एक वेळ मी अशीच फसले आहे म्हणून हा मला कुठें नेत असेल याची काळजीच वाटते बाई! परमेश्वरा, आतां तुला माझी दया येऊं दे! अजून किती दुःख भोगायचं राह्यलं आहे कुणाला ठाऊक! ( इतक्यांत विश्वासरावाकडे नजर जाऊन चपापून ) अगबाई, स्वारीच आहे इथे? देवा, आतां मात्र माझी दया तुला आली खचित! आतां मला मुलीचं दुःख राह्यलं नाहीं.

**सोन्या**–( राम राम करून विश्वासरावास ) धनीसायेब, बाईसायेब आल्यातीं.

**विश्वास०**–बरं; तूं जा आपल्या कामाला.

**सोन्या**–व्हय धनीसायेब. ( रामराम करून जातो. )

**विश्वास०**–( सोन्या गेलासें पाहून सुशिलेस ) केवढा तुझ्यावर हा प्रसंग आला होता ? पण, परमेश्वराची कृपाच म्हणून तो निभावला! त्या कृष्णरावाच्या जाचानं किती तरी कोमेजून गेली आहेस ही ? डोळे तरी किती खोल गेले हे! ( तोंडावरून हात फिरवून ) आतां ह्यापुढें तुला मुळींच दुःख होणार नाहीं; समजलीस ना ?

**सुशीला**–त्या मेल्या कृष्णरावानं माझा अगदीं सूडच काढलान! तो मेला असं बोले कीं, काळजाला घरंच पडावींत! देवानं माझं गाऱ्हाणं लवकरच ऐकलन म्हणूनच मी आपल्या नजरेस पडल्यें नाहींतर ह्या जीवाचा कंटाळा आला होता अगदीं!

**विश्वास०**–( जवळ घेऊन ) आतां झाल्या गोष्टींचा विचारच नको. आनंदाच्या गोष्टी बोलून विरहदुःख नाहींसं करून टाकलं पाहिजे. कारण, त्या देवाच्या मनांत आल्याबरोबर किती अल्प काळांत मला तूं भेटलीस ? परमेश्वरा, तुझ्या लीला अगाध आहेत!

**सुशीला**–( हांसून मानेस हिसडा देऊन ) हें काय असं ? मला तेवढं सांगायचं झाल्या गोष्टींचा विचारच नको म्हणून आणि इकडे तर तेच विचार चालले आहेत!

**विश्वास०** ( थट्टेनें ) नाहीं; आतां मी बोलतच नाहीं म्हणजे झालं ना ?

**सुशीला**–गेल्या गोष्टींचा विचार चालला आहे येवढंच ह्मटलं? मी बोलायला आडकाठी नाहीं केली कांहीं?

**विश्वास०**–( खांद्यावर हात टाकून ) बरं, पण उभं किती वेळ राह्यचं असं? मी बसलों आणि तूं अशी उभीच राहणार? ये, अशी ये?

**सुशीला** ( मुरकून ) आहे तेंच चांगलं आहे. बायकांनीं मुळीं उभंच राहावं.

**विश्वास०**–( थट्टेनें ) पण केव्हां? चार लोक असतील तेव्हां? एकांताच्या वेळेला हा नियम नाहीं लागू करायचा ये आतां ये; का उठूं मी?

**सुशीला**–इश्श मी ऐकत का नाहीं? मग उठायचं कशाला तें?

**विश्वास०**–( उठून ) बायकांची जात मोठी हट्टी आणि मानी असते ह्मणून विचारलं. बरं पण अझून तरी बसायचं आहे कीं नाहीं? ( तिचा हात धरून बसवितो )

**सुशीला**–( लाजून ) हर्थ आहे बाई पुरुषांपुढें तरी! एकदां मनांत आलं कीं, मुळींसुद्धां उपाय नाहीं! ( बसून ) हं बसल्यें; झालं ना?

**विश्वास०**–( हातांत हात घालून ) माझा जीव किती थंड झाला ह्मणून सांगूं? कमलिनी पासून भ्रमराला होणाऱ्या आनंदापेक्षां सुद्धां आजचा माझा आनंद जास्तच होईल! तूं कृष्णरावाकडे आहेस असं कळ-

त्यापासून माझं सगळं लक्ष एखाद्या पारव्याप्रमाणं अगदीं तुझ्याचकडे असे! डोळ्यांपुढें तुझी मूर्ति रात्रंदिवस उभी असे! मी निवळ वेडापिसाच झालों होतों आणि त्याच वेळेस तुझे भाऊ आले होते.

**सुशीला**–( स्वगत ) आमची लहानपणापासूनची प्रीति ह्या थरावर आलेली भाऊंच्या कानावर आली वाटतं? ( उघड आनंदयुक्त ) कोण, माझे भाऊ का आले होते? यायचं कारण तरी काय बाई?

**विश्वास०**–' कारण काय ' ह्मणजे? तूं त्या कृष्णरावाच्या जबड्यांत सांपडली होतीसना?

**सुशीला**–मग, ह्मणून?

**विश्वास०**–तुला मी सोडवावी ह्मणून आले होते.

**सुशीला**–( स्वगत ) हं हं; इकडे आणि कृष्णरावाचा स्नेह होता ह्मणून त्यांनां आशा लागली असेल दुसरं काय? छे बाई, पण त्यांनां आमचीं मनं कळलीं आहेत कीं काय कुणाला ठाऊक! पण माझी ही थट्टा तर नसेलना होत? ( उघड ) मला इतकं का मेलं नाहीं समजत? इश्श! थट्टाच न ही?

**विश्वास०**–मी तुला सांगितलं आले होते आणि तूं तर ह्मणत्येस ही थट्टाच आहे तव्हां वेडी नाहींतर काय? वेड्याला आणखी शिंगं का असतात? खरंच आले होते.

सुशीला–त्यांचा इकडे यायचा संबंध तरी काय अगोदर?

विश्वास०–संबंध काय? अग संबंध तुझाच.

सुशीला–पुरे झाली बाई थट्टा! आतां खरं नाहीं का सांगायचं? कां मूग गिळून बसूं?

विश्वास०–( हनुवटीस हात लावून ) अरेच्या! राग का आला तुला? बायकांचा राग ह्मणजे अगदीं नाकावर! बरं, आतां खरं सांगूं?

सुशीला–अजून सांगूं ह्मणूनच का विचारायचं आहे?

विश्वास–हें बघ, तुझे भाऊ आले आणि ह्मणाले 'त्या कृष्णरावानं माझ्या सुशिलेला फसवून नेली आहे आतां मी गरीबानं काय करावं. पण, तुह्मी तरी तिला सोडवण्याचा प्रयत्न करा. तुमच्या दोघांचा स्नेह आहे तेव्हां तो तुमचं ऐकेल.'

सुशीला–मग, त्यांना इकडून काय सांगायचं ह्मटलं? भलभलतं नाहींना सांगितलं?

विश्वास०–मी त्यांना स्पष्ट सांगितलं कीं, आमची दोघांची एकमेकांवर प्रीति जडली आहे इतकंच नव्हे तर, मी तिजबरोबरच विवाह करण्याचा निश्चय केला आहे.

सुशीला–इश्श! अगदीं अस्सं सांगायचं न?

विश्वास०–हो, अगदीं अस्संच सांगायचं हो! हें बघ, आतां इथे कंटाळा आला बोवा! कांहीं वेळ बागेंत तरी जाऊं कां यायचं ना?

सुशीला-हो; माझी नाहीं हरकत.

विश्वास०-बरं तर चला जाऊं.

( हातांत हात घालून दोघें निघून जातात. )

( पडदा पडतो. )

प्रवेश ५ वा.

पात्रें-कृष्णराव, मन्या व मारेकरी.

स्थळ-कृष्णरावाचा दिवाणखाना.

( कृष्णराव बसला असतां पडदा उघडतो. )

कृष्ण०-( स्वगत ) हे नोकर लोक ह्मणजे पहिल्या प्रतीचे उनाड ! ह्या गुलामांना पगार वाढवा आणखी काय वाटेल तें करा ते मिळून रगेलपणा करायचेच ! सेवटीं ती निसटून गेली अँ !

( इतक्यांत मन्या येतो. )

मन्या-( प्रवेश व रामराम करून ) म्हाराज गाडी जोड-लीया गाडी.

कृष्ण०-( रागानें ) बैला, तुला तिच्या तैनातीला ठेवला होताना? मग ती गेली कुठे?

मन्या-( भेदरून ) बाईच झोप लागलीती; डोल उगडून बगतो तो—

कृष्ण०- चोरा, खोटं बोलतोस का? ( त्याचा कान धरून ) खरं बोल; नाहीं तर याद राखेसे फटके देईन; बोल बोल ( कान सोडतो )

**मन्या**—( कान चोळीत चोळीत स्वगत ) आता त्ये पाच रुपय बसत्याल गळ्याशी; पन् घ्येतल तर खर; काय व्हईल त्ये व्हईल ( हात जोडून उघड ) म्हाराज, आइ-च्च्यान् मना नाई ठावां! धन्या जवल कशापायी लटक बोलूं?

**कृ॰ण॰**—बस्स, बस्स; फाजील बोलूं नकोस. ( स्वगत ) फार करून ती पळूनच गेली! कोणत्या सामर्थ्यानं तिला साह्य केलं, परमेश्वराला ठाऊक! मला मन्याचा संशय होता; पण मी इतका दरडावल्याबरोबर तो कबूल करता. त्याला तरी विनाकारण त्रास देण्यांत कांहीं हंशील नाहीं. आतां नुसती चवकशी करण्यांत वेळ घालवून उपयोग काय? किती शिताफीनं तिला फसवली होती! इतक्या बंदोबस्तांत ठेवलेली पळालीस आँ? ठीक आहे; पण ह्या कृष्णरावाशीं गांठ आहे म्हणावं? वर्षाचे दिवस तीनशें पांसष्ट आहेत. कधींनाकधीं तरी मी आपली प्रतिज्ञा खरी करणारच. पुन्हां मन्याला पाठवूं का? छेः ती अगदीं दुधखुळीच असेल यायला? अगदीं डोळ्यांत तेल घालून बसून तिला एकटीला पाहिल्याबरोबर गाडींत घालून तावडतोब घराची वाट सुधारावी झालं! पोलिसची धास्ती मला नाहींच ( विचार करून ) हें कसं जुळावं? छेः त्यापेक्षां पहि-ल्या प्रथम हा विश्वासाचा कांटा काढून टाकला पा-हिजे. त्याच्या शिवाय तिची निराशा झाली

ह्मणजे माझा हेतू सहज साधेल. मऱ्या, जा त्या बड्या मांगाला घेऊन ये पाहूं. त्याला ह्मणावं फार जरूरीचं काम आहे. आणि जातांना त्या गाडीवाल्याला गाडी सोडून ठेवायला सांग.

**मऱ्या**–( हात जोडून ) जी, व्हय ह्माराज.

( असें ह्मणून जातो. )

**कृष्ण०**–( स्वगत ) ही गोष्ट तिसऱ्या कानाला कळतां उपयोग नाहीं. जरका हें उघडकीस आलं तर जीवाची आशाच नको ! पैसा ह्मणजे पाण्यासारखा खर्च केला पाहिजे तेव्हां हें सगळं जिरेल. फार लांबणीवर टाकून चालणार नाहीं.

( इतक्यांत मऱ्या व मारेकरी येतात. )

**मऱ्या**–( प्रवेश व रामराम करून ) ह्माराज, बड्याला हानलाया.

**बड्या**–( मुजरा करून ) कां बोलावलं हाये ?

**कृष्ण०**–कां नाईक, आलीकडे तुमचा धंदा कसा काय चालतो ?

**बड्या**–कसला धंदा घ्येऊन बसलाया रावसायेब ? गेल्या सालाला तर धंदा तर शाप बसला बगा ! सावकाराचां करज काढकाढून समदा निरभाव चालवला हाये ! दीस अक्षि लई वंगाळ आल रावसायेब ! न्हाईतर आमाना फुरसूतबी घवसत नस. हा राजा लई

कुरपालू ! रावसायेब, ह्मा जीव जगल त्यापायी पन् आमच्या मातर पोटावर पाय आल बगा! बर, पन काम तर कलुंद्या ?

**कृष्ण०**–हें बघ, तें अगदीं गुप्त आहे; हूं का चूं कळतां उपयोग नाहीं. बेलभंडार घेऊन शपथ घेशील तर सांगतों.

**बडग्या**-( बेलभंडार उचलून ) कोनालाबी न्हाई सांगनार.

**कृष्ण०**-त्या तात्यासाहेब सावकारांचा मुलगा आहे का तुला ठाऊक ?

**बडग्या**–अंधूक अंधूक पायला असल कवचित.

**कृष्ण०**–बरं ते सगळं हा मन्या दाखवील तुला–त्याला नाहींसा करून टाकायचा आहे. मग बोल तर काय घेशील ? ह्मणजे नक्की ठरवूं कसं करायचं तें; पण काम कसं बेमालूम झालं पाहिजे ?

**बडग्या**-त्याविशी नको संका.

**कृष्ण०**–मग बोल तर.

**बडग्या**–आँ, द्या पाच धा हाजार रुपय झाल; काई लई मागायच ह्ये रावसायेब ?

**कृष्ण०**–ठीक आहे; (स्वगत) पैशाकडे पाहण्याची ही वेळ नाहीं. (उघड) मी सांगतों इकडे चांगलं लक्ष ठेव. परवां रात्रीं दहा वाजतां तूं आपल्या सोबत्याला घेऊन इकडे ये; ह्मणजे मग आपण तिकडे जाऊं. तो कोठें निजतो

तें मन्या दाखवील. मी दरवाज्या जवळच उभा असेन; तुह्मी चटकन त्याला ठार करा आणि तो मुर्दा लागलाच समुद्रांत द्या टाकून. हें सगळं मुकाट्यानं करा. पैशांची काळजी नको तुह्मांला समजलास ?

**बड्या**- मंग परवा धा वाजता आमी येऊ. पोटाला काई मिलल—

**कृष्ण०**—पोटाला ? ( नोट काढून देऊन ) हं हे घे. परवांचं लक्षांत ठेव.

**बड्या**—व्हय व्हय; मंग ध्येऊ रजा रावसायेब ?

**कृष्ण०**-बरं जा.

**बड्या**-ध्येतो रजा ( मुजरा करून जातात. )

**कृष्ण०**-( ते गेल्यावर ) मन्या, जरा माझ्या बरोबर ये पाहूं. ( जातो. )

**मन्या**—व्हय म्हाराज. ( जातो. )

( पड्दा पडतो. )

---

## प्रवेश ६ वा.

पात्रें–सोन्या व मन्या.

स्थळ–रस्ता.

( मन्या भाजी आणण्याकरितां चालला असतां पडदा उघडतो )

**मन्या**–( स्वगत ) भाजी तर लई ह्मांग झालीया. बरच दिसात पै सापीकाबी खाया घवसला न्हाई. आज तरी काई मिलल तर ब्येस व्हईल.

( इतक्यांत सोन्या येतो. )

**सोन्या**–( प्रवेश करून मन्यास रामराम करून ) काव? इतक लगबगीन कुट चाललात मन्यादा?

**मन्या**–( रामराम करून ) सोनबा, चाललोया बाजाराला; भाजीबीजी लईवाईच मिळाली तर पावी ह्मनतो.

**सोन्या**–खबरबात ठीक हायेना? तुमची अक्षि चैन हाये!

**मन्या**–खबरबात व्हय? तुमच्या पोटावर धाड आलीया धाड!

**सोन्या**–कां बरां? मंजी? तुमचा सबद न्हाई उमगत मना!

मन्या--सबद् कसला? अव राव तुमच धनी जानार परवा.

सोन्या-कुट जानार कुट? मना न्हाई कललां.

मन्या-पन् मी सांगतो ना?

सोन्या-पन् जानार तरी कुट?

मन्या-जानार? (स्वगत) तोंडावाट सबद तर निंगाला आतां काय करावां? पन् आपुन कलवल्यावगर आपल्या पोलीची तरी सोय कशी व्हनार? समदां सांगावां. (उघड) अव आमच्च्या धन्याचा तुमच्या धन्याला नाइसा करायचा झाला हाये इचार तवा तुमी चांगल हाका मारीत बसाल की?

सोन्या (स्वगत) धन्याला मारनार? मंग आतां धन्याला जपलां पायज्येल! त्येलाच समदां कलावलां तर? नको; धनी घाबरल येकादा! सासतरीबोवांना सांगावां (उघड) बर जातो; लई दीस आला! (जाऊं लागतो)

मन्या-(स्वगत) मना काई मिलल म्हून मी गोठ काढली येवढां सोनबाला तरी सांगून ठ्येवावां. (उघड) सोनबा, पन् मना येवढं-सोनबा-सोनबा-

(सोन्या जातो व मन्याही त्याच्या पाठीमागून हाका मारीत जातो)

(पडदा पडतो.)

## प्रवेश ७ वा.

पात्रें—शास्त्रीबोवा व सोन्या.

स्थळ—शास्त्रीबोवांची ओटी.

( शास्त्रीबोवा बसले असतां पडदा उघडतो )

शास्त्री०—( स्वगत ) विश्वासराव तरी धूर्त खराच! कुलशीलवान ह्मणतात तें ह्यालाच. मी गेल्याबरोबर उठून त्यानं माझा केवढा तरी आदरसत्कार केलान! हा माझा इतका मान ठेवील हें माझ्या स्वप्नीं सुद्धां नव्हतं! कारण, हीं पडलीं श्रीमंतांचीं मुलं 'शास्त्रीबोवा ना? आहेत ठाऊक, येतात रोज,' असं ह्मणायचीं. पण ह्याच पाहिलं तों अगदींच भिन्न प्रकार! किती आदबीनं बोलतो! हा जरी दुस्माना जवळ बोलूं लागला तरी त्याच्या मनांत पूज्य भाव उत्पन्न व्हायचाच. मुलगा फार सद्गुणी निघाला. मी केलेल्या उपदेशास न झिडकारतां तो त्यानं अगदीं मनापासून ऐकून घेतलान इतकंच नव्हे तर, त्यानं आपला निश्चय सुद्धां मला सांगितलान. कृष्णरावाचा संबंध तोडण्याचा त्याचा विचार फारच पसंत आहे. पण जनूभटजींच्या सांगण्यावरून कृष्णरावानं ह्याला धोक्यांत आणण्याचा मार्ग धरला आहे असं दिसतं. स्त्रियांच्या संबंधांत काय होईल आणि काय नाहीं ह्याचा कांहींच नियम नाहीं!

( इतक्यांत सोन्या येतो. )

**सोन्या**–( प्रवेश व रामराम करून ) सासतरीबोवा, फुरसत हायेका वाईच ?

**शास्त्री**०–कांरे, इतका कां घाबरला आहेस ?

**सोन्या**–शासतरीबोवा, माज्याच्यान बोलवतबी न्हाई !

**शास्त्री**०–( घाबरून ) अरे, झालं तरी काय असं ?

**सोन्या**–त्या अन्नासायबाच्या ल्योकानं आपल्या धाकल्या धनसायबांनां ठार मारायाचा ब्येत केला हाये !

**शास्त्री**०–काय ? काय ह्मणतोस ? ( स्वगत अति दुःखानें ) ह्याच थरावर शेवटीं गोष्ट आलीना ? अरेरे ! हा अधमा, कृष्णरावा ? आतां मात्र तुझीं पुरीं शंभर वर्षें भरलीं ह्मणून खास समज ! आह्मांला कळल्यावर तुझे हेतू तडीस जातील ? त्याचं नांवच नको ! ( उघड ) कायरे, बेत केव्हांचा आहे ? तुला कळलं तरी कसं ?

**सोन्या**–मन्या बोलला का परवा हाये म्हून !

**शास्त्री**०– हें बघ, आपल्याला अगदीं सावध राहिलं पाहिजे. ही गोष्ट विश्वासरावाच्या कानावर मुळींच घालूं नकोस. मी परवां संध्याकाळीं लवकर जेवण आटपून तिकडे येईन. मग सांगेन त्याप्रमाणें वाग ह्मणजे झालं ! मग त्याचे हेतू कसे तडीस जातात तें पाहूं. समजलास ? जा आतां तूं. कोणाजवळ बोलूं मात्र नको.

**सोन्या**-व्हय व्हय; जातो तर आता (रामराम करून जातो)

**शास्त्री**-अरे नीचा, कृष्णसर्पा, भोग आपल्या कर्मांचीं फळं यथास्थित भोग! (वर पाहून) अरे! उशीर फार झाला. सदोबांकडे सप्तशतीचा पाठ वाचायला जायचं आहे आणि बसून कसं चालेल? (जातो)

(पडदा पडतो.)

## प्रवेश ८ वा.

**पात्रें**-विश्वासराव, शास्त्रीबोवा, कृष्णराव, सदोबा, सोन्या, मन्या, मारेकरी वगैरे.

**स्थळ**-विश्वासरावांचा दिवाणखाना.

(कृष्णराव बसला आहे असा पडदा उघडतो.)

**कृष्ण०**-जें घोर कर्म करण्याची माझी इच्छा झाली आहे तें तडीस गेलं ह्मणजे मात्र मला सुखप्राप्ति खचित होणार!

(इतक्यांत मन्या येतो.)

**मन्या**-(प्रवेश व रामराम करून) म्हाराज बड्या आलाया. त्याच्यासंगं दुसरबी लोक हायेत.

**कृष्ण०**-बोलाव त्यांना.

**मन्या**-जी म्हाराज. (असें ह्मणून मारेकऱ्यांस घेऊन येतो)

(मन्या व मारेकरी येतात.)

**कृष्ण०**–( मारेकऱ्यांस ) कायरे बड्या, झाली तयारी?

**बड्या**–व्हय रावसायेब; आपुन हुकूम कराया खोटी का जाऊनशान् त्येचा मुर्दा पाडलाच समजा.

**कृष्ण०**–ठीक आहे. ( मऱ्यास ) मऱ्या तूं जा ह्यांच्या बरोबर आणि विश्वासरावाचं निजण्याचं ठिकाण ह्यांना दाखव. बड्या, सावधगिरीनं काम कराहं. चला तुह्मी पुढे चला मी हा आलोंच तुमच्या पाठोपाठ.

**बड्या**–जातो तकड तर मग रावसायेब.

**कृष्ण०**–हं जा; अगदीं हुषार असा.

**बड्या**–व्हय व्हय; ( मऱ्यास ) चला आमच्यासंगं.

**मऱ्या**–चला मांजी तयारी हाये.

( सर्व रामराम करून जातात )

**कृष्ण०**–( सर्व गेल्यावर स्वगत ) आपण तरी उशीर कशाला लावावा? जावं तिकडेच ( जातो )

( विश्वासराव निजला आहे असा पडदा उघडतो; शास्त्रीबोवा प्रवेश करितात )

**शास्त्री**–( प्रवेश करून ) ते लोक येण्याची अगदीं वेळ झाली आहे. ( विश्वासरावाजवळ जाऊन ) स्वारी किती मजेंत झोंप घेते आहे? आपल्या जीवावर असा प्रसंग येणार आहे ही गोष्ट ह्यांच्या स्वप्नीं तरी असेल काय छे छे: ( निरखून पाहून ) बिचाऱ्याला झोंप तर गाढ लागली आहे!

( सोन्या व दुसरे हुजऱ्ये येतात )

**सोन्या**-( शास्त्रीबोवांस रामराम करून ) सासतरीबोवा तुमी कवा आलात? ब्येस झालं मी वाटच बगत व्हतो आपली.

**शास्त्री०**-सोन्या, तुह्मी तिघे ( बोटानें ठिकाण दाखवून ) इथे उभे रहा आणि आह्मी दोघे राहतों इथे दरवाज्यामागें. इकडे पहा, ते आल्या बरोबर सर्वजण त्यांच्या आंगावर तुटून पडूं. मेलों तरी हरकत नाहीं. तुह्मी आपल्या तरवारी आणल्या आहांत ना बरोबर?

**सर्व हुजऱ्ये**-( तरवारी पडताळून ) ह्या बगा हायेत या?

**शास्त्री०**-ठीक आहे. वेळ आली ह्मणजे बेलाशक वार करून त्यांनां लंगडे करून टाका; पण प्राण घ्यायचा नाहीं हो? ( सोंटा दाखवून ) मी पण सावधगिरीनंच आलों आहें. तुह्मी अगदीं सावध असा. आतां जा आपापल्या जागेवर.

( सर्व लपून राहतात व मारेकरी, मन्या, कृष्णराव ही मंडळी येतात. )

**मन्या**-( बडघास ) त्यो बग निजला हाये थतं.

**कृष्ण०**-( सर्वांस हळू ) मी दरवाज्याशीं राहतों उभा. हं झाटपा; उशीर लाऊं नका.

( जातो व दरवाज्याशीं उभा राहतो. )

( विश्वासरावा जवळ मारेकरी जाऊन तरवारी उपसतात तोंच शास्त्रीबोवा वगैरे मंडळी त्यांस पकडते )

**शास्त्री०**–( पकडलेल्या इसमांस ) जीव घेण्याचं साहस? धिःकार! धिःकार!! प्रायश्चित्त चांगलं मिळेल!

**विश्वास०**–( दचकून जागा होऊन स्वगत ) काय? ह्या ठिकाणीं येवढी गरदी कसली? ( उठून शास्त्रीबोवांस ) कायहो, हें आहे तरी काय?

**शास्त्री०**–तें कांहीं विचारूं नका. परमेश्वराची कृपा ह्मणूनच आपले प्राण वांचले नाहींतर ( कृष्णरावाकडे बोट दाखवून ) ह्या मांगानं भयंकर कृत्य केलं असतं! ह्यांचा हा बेत सोन्यानं मला सांगितला ह्मणून ह्यांचा हा डाव फसला.

**विश्वास०**–( कृष्णरावास रागानें लोटून ) घातक्या! माझ्या प्राणावर उठलास?

**कृष्ण०**–(फार भीतीनें नम्र होऊन ) विश्वासराव, ह्या दीनावर दया करा. मी तुमचा सर्वस्वी अपराधी आहें. तुह्मी दयावान आहांत मी तुह्मांला शरण आलों आहें आतां ह्याचं रक्षण करा! मला वांचवाहो वांचवा! ( पाय घट्ट धरतो. )

**विश्वास०**–( लाथेनें ढकलून ) बेशरम, सोडा ह्मणतोस? ( सोन्यास ) सोन्या, तुलारे कसा हा बेत समजला? आणि माझ्या जवळ बोलला नाहींस तो?

**सोन्या**–( भीत भीत ) धनीसायेब, मांज्या जवळ हा मन्या बोलला. पन् अशी वंगाल बातमी धन्याशी

काडाया मना धीर व्हईना धनीसायेब ! म्हून सासतरी बोवांशीं बोललोया.

**विश्वास०**-शाबास! शाबास! सोन्या, माझा प्राण वांचवल्याबद्दल हें घे तुला बक्षीस (गळ्यांतील कंठा देतो) कायरे मन्या, माझ्या सोन्याजवळ तूंच बोललास?

**मन्या**-( भीत भीत ) व्हय म्हाराज.

**विश्वास०**-कांहीं तरी लालूच मिळावी ह्मणून बोलला असशील? पण हें पहा, दुसऱ्यांपासून लांच खाण्याचा धंदा सोडून दे. तुझ्या ह्या कृत्याबद्दल तुला मी आपला नाईक केला आहे समजलास? इमानानं राहशील?

**मन्या**-( आनंदयुक्त होऊन ) व्हय व्हय धनीसायेब अगदीं इमानानं ऱ्हाईन. कुनापासना बी लाच खायाचा न्हाई.

**विश्वास०**-( सोन्यास ) सोन्या, त्याला सोड आणि नाईकाचा पोषाख आणून दे.

**सोन्या**-व्हय धनीसायेब ( असें ह्मणून पोषाख आणून देतो. )

**विश्वास०**-( शास्त्रीबोवांस नम्रपणें ) शास्त्रीबोवा आज मी केवळ आपल्याच कृपाप्रसादानं जगलों! तुमचे हे उपकार फेडण्यास माझेजवळ कांहींच नाहीं! ज्या उपकारांचं मोल होणार नाहीं अशा उपकारांची फेड तरी कशानं होणार?

**शास्त्री०**–विश्वासराव, ह्यांत मी कांहींच केलं नाहीं. आपल्या वडिलांच्या व आपल्या पुण्याईनंच तुह्मी वांचलांत यांत संशय नाहीं ! असो; झाल्या गोष्टी चांगल्याच झाल्या ! हें शुभ वर्तमान मी तात्यासाहेबांनां कळवतों. ( उठतो )

**विश्वास०**–शास्त्रीबोवा, ह्या बेरडांची वाट ?

**शास्त्री०**–वाट काय लावायाची आहे ? ह्या चांगला खरपूस मार आणि घ्या गुलामांचीं खातीं पाडून ह्मणजे ह्या गोष्टीचा गांवांत मुळींच बोभाट होणार नाहीं. बरं मी जातों आतां ?

**विश्वास०**–बरं; हा विश्वास आपला जन्माचा ऋणी आहे ( नमस्कार करतो )

**शास्त्री०**–छे छेः ऋणी कसले ? परमेश्वराची कृपा (जातो.)

**मांग**–( हात जोडून ) आमाला सोडा, सोडा. पुना अस न्हाई करनार बगा ! ह्या पोटाला आग लागना म्हून ही अशेली वंगाळ कामां करावी लागत्यात धनीसायेब.

**विश्वास०**–तुह्मी हा धंदा सोडून द्या.

**मांग**–मंग हीं पोटां कशीं जळनार ?

**विश्वास०**–तुह्मी माझ्याइथें राहतां काय ?

**मांग**–व्हय व्हय; मंग आमच्यावर लई कुरपाच व्हईल !

**विश्वास०**–ठीक आहे. सोन्या, जा सदोबांनां बोलाव.

**सोन्या**–जी व्हय. ( जातो.)

**कृष्ण०**–( हात जोडून ) विश्वासराव, माझी काय वाट लावणार ?

**विश्वास०**–हा कोडग्या, मुकाट्यानं साडेसात लाखांचं खातं पाडून दे आणि हो इथून चालता. ह्या तुझ्या घोर कर्मीचं परमेश्वर तुला योग्य शासन देईलच.

( सदोबा व सोन्या येतात. )

**सदोबा**–( प्रवेश व नमस्कार करून) काय हुकूम आहे ?

**विश्वास०**–( कृष्णरावाकडे बोट दाखवून ) ह्या बेरडाचं साडेसात लाखांचं खातं पाडून घ्या आणि ह्या मांगांची चाकरीखतं लिहून घ्या.

**सदोबा**–होय महाराज. सोन्या, माझा रुमाल घेऊन ये.

**सोन्या**–व्हय ( रुमाल घेऊन येतो )

( सदोबा खातें व चाकरीखतें लिहून त्यांच्या सह्या घेऊन ते कागद विश्वासरावाच्या पुढें ठेवतो. )

**विश्वास०**–(कागद पाहून) मांगांनों, तुह्मी आजपासून माझे जन्माचे नोकर झालांत. दरवाजावर पाहारा करण्याचं काम तुमच्याकडे दिलं आहे. जा आपल्या कामगिरीवर. सोन्या, सोड त्यांना आणि दोघांनांही शिपायाचा पोषाख दे जा.

( तिघे जातात. )

**विश्वास०**–( कृष्णरावास खातं दाखवून ) हे साडेसात लाख रुपये तावडतोब दिले पाहिजेत. चल नीघ येथून. ( मन्यास ) नाईक, सोडा त्याला आणि दोन लाथा मारून द्या हाकलून.

**मन्या**–व्हय म्हाराज.

( मन्या कृष्णरावास सोडून लाथा मारून हांकलून देतो व पडदा पडतो. )



अंक ४ था समाप्त.

# अंक ५ वा.

## प्रवेश १ ला.

पात्रें कृष्णराव व सोन्या.

स्थळ-कृष्णरावाची पेढी.

**सोन्या**-( प्रवेश करून ) भली खोड मोडली गुलामाची! लई उड्या मारित व्हता नाई? धन्यान सांगितल्या परमानं आता करस्नरावाकड जावां अन त्येला रुपयांचा करावा तगादा. त्येला रामराम करावा का न्हाई बरां? काल राती तर गुलामाला खूप चोप दिला आन आता त्येला रामराम? आन त्यो कशापाई! चला येळ गमांवता न्हाई उपयोग. ( जातो. )

( कृष्णराव पेढीवर बसला आहे असा पडदा उघडतो)

**कृष्ण०**-( चिंताग्रस्त होऊन ) शेवटीं दुर्दैवानं आपला हेतू पूर्ण केलान! विश्वासराव खरेखरच मोठा भाग्यवान! मी जेवढा त्याचा पैसा दावला त्याच्या दामदुप्पट रक्कम त्याला मी देऊं तरी कुठून! जें जें केलं तें तें सगळंच उलटं झालं. आतां करूं तरी काय? पाडून दिलेल्या खात्याची रक्कम तावडतोब विश्वासरावांनीं मागितली ती आतां आणूं कुठून? सगळं घरदार जरी त्यांच्या हवालीं केलं तरी देखील

फेड होणार नाहीं. हे दीनवत्सला परमेश्वरा! तूं न्यायी असतांनां मजवर असा कसा हा प्रसंग आणलास? अथवा 'जसं करावं तसं भोगावं' हेंच खरं. एकंदरींत दैवानं माघारच घेतली खरी!

( इतक्यांत सोन्या येतो. )

**सोन्या**–( मोठ्या ऐटीनें प्रवेश करून ) अहो, पैस द्या पैस; इसवासरावांनीं मागतल हायेत लवकर द्या.

**कृष्ण०**–( कपाळाला हात लाऊन ) कर्म माझं! आतां रडून कसं चालणार? ( सोन्यास ) सोनबा, कोठून देऊं पैसे? नाहींत माझ्या जवळ!

**सोन्या**–त्यां काई नाई. पैस काडा अदुगार; तवाच हलन हथून; चला काडा ब्येगी.

**कृष्ण०**–सोनबा, खरोखरच नाहींत हो, मी काय करूं?

**सोन्या**–आन् मंग धन्याच चावताना न्हाई दात पडल? तवा लई ग्वाड लागल न्हवका?

**कृष्ण०**–सोनबा, पाया पडूं का तुमच्या?

**सोन्या**–( स्वगत ) 'पाया पडू का' इचारतोया आता कसा मांजरावानी झालाया? न्हाईतर जसा वाग गुरगुरत व्हता वाग! ( उघड ) मंग न्हाईका घेत? सांगू जाऊनशान? तुमाला लई जड जाईल बगा?

( मिशीस पीळ देत देत जातो. )

**कृष्ण०**–( दुःखानें ) गेली आतां माझी सर्व अब्रू गेली ! कुत्रासुद्धां माझे हाल खाणार नाहीं ! कसली पेढी आणि कसलं काय ! कांहींच सुचत नाहीं. साफ गोंधळून गेलों आहें ! पेढीवर बसून तरी काय करायचं आहे ? बंद करून घरीं जाऊन बसावं झालं !

( पेढी बंद करून जातो आणि पडदा पडतो. )

## प्रवेश २ रा.

**पात्रें**–तात्यासाहेब, विश्वासराव व शास्त्रीबोवा.

**स्थळ**–तात्यासाहेबांचा दिवाणखाना.

( तात्यासाहेब व शास्त्रीबोवा बसले असतां पडदा उघडतो. )

**तात्या०**–शास्त्रीबोवा, तुमच्यामुळं माझा मुलगा जगला बरं ? नाहींतर म्हातारपणीं माझ्यावर केवढा प्रसंग आला होता हा ? तुमचे मजवर अतोनात उपकार झाले ते आतां माझ्यानं कसे फिटतील ? तुह्मीच सुखाच्या राज्यावर मला बसवलंत !

**शास्त्री०**–हें पहा तात्यासाहेब, हें सगळं तुमच्याच पुण्यप्रतापानं झालं यांत शंकाच नाहीं. मला विनाकारण मोठेपणा कशाला देतां ? मी कांहींसुद्धां केलं नाहीं. हे सर्व त्या एका परमेश्वराचेच दुसरं काय ?

तात्या०–शास्त्रीबोवा, हें अगदीं सत्य बोललांत. आह्मी मनुष्य सुखाच्या वेळेस त्या परमेश्वराला विसरतों बरं? हरहर! किती हा नीचपणा! परमेश्वरा तुझी लीला अगाध आहे! सर्व विश्वाचा चालक तूंच! तूंच सर्व शक्तिमान; प्रभो, अशा वेळीं मी तुला विसरावं हा माझा फारच मोठा अन्याय आहे! सर्वेश्वरा, मला ह्या अन्यायाबद्दल क्षमा कर!

शास्त्री०–तात्यासाहेब, झाल्या गोष्टी कांहीं परत येत नाहींत!

( इतक्यांत विश्वासराव येतो. )

विश्वास०–( धांवत येऊन तात्यासाहेबांच्या पायावर लोटांगण घालून ) बाबा, बाबा, तुमच्या पुण्याईनं हा मी जिवंत आलों! ( रडूं लागतो. )

तात्या०–( डोळ्यांस पाणी आणून ) बाळा विश्वासा, ऊठ आतां ऊठ. उगीच शोक करूं नकोस. त्यास उठवितो व त्याचे डोळे पुसतो. ) विश्वासा, तुझा अपमृत्यू प्रभुसत्तेनं टळला; नाहींतर हें जग मला ओस किरे झालं असतं. ( त्यास पोटाशीं धरून रडूं लागतो. )

शास्त्री०–शोक करण्याचं मुळींच कारण नाहीं?

तात्या०–( विश्वासास ) बाळा, इथे बस. ( शास्त्रीबोवांस) शास्त्रीबोवा, माझा हा आजचा आनंद त्रैलोक्यांतसुद्धां मावत नाहीं! माझ्या मनांत आनंदोत्सवा प्रीत्यर्थ सर्वत्रांस भोजन घालावं.

शास्त्री०-( मान डोलवून ) वाहवा ! फार उत्तम. तशांत विश्वासरावांचा आजच वाढदिवस आहे.

( पडदा पडतो. )

## प्रवेश ३ रा.

**पात्रें**-विश्वासराव, सदोबा व सोन्या

**स्थळ**-विश्वासरावाचा दिवाणखाना.

( विश्वासराव व सदोबा बसले असतां पडदा उघडतो)

**विश्वास०**-सदोबा,साल अखेरचे हिशेब पुरे झालेका सगळे?

**सदोबा०**-सगळ्यांचे पुरे झाले नाहींत !

**विश्वास०**-तर मग ते लवकर पुरे करून टाका. कुळांच्या पाठीमागें सारखी मागणी लावा. काळजीपूर्वक व्याज पोंचतं करणारे लोक थोडे ! त्यांच्या जवळ डोकंफोड केल्याशिवाय पैसे येणार नाहींत समजलांत ?

**सदोबा०**-होय महाराज !

( इतक्यांत सोन्या येतो व रामराम करतो. )

**विश्वास०**-( सोन्यास पाहून ) कायरे, तो कृष्ण्या देतो आहे कीं नाहीं रुपये ?

**सोन्या**-न्हाई. त्यो बोलला माज्या जवळ हायेत कुट पैस ! मांजां नशीब फिरल्या ! आक्षि योक दमडीबी न्हाई !

विश्वास०–( स्वगत ) अरे चांडाळा, माझे इतके पैसे उधळतांनां कांहींतरी विचार केलास काय? आणि आतां देतांनां जड कां लागतात? तुझ्या जवळ असेल नसेल तेवढं सगळं माझंच आहे. तूं काय समजला आहेस? घशांतून रुपये काढल्या शिवाय तुला सोडीत नाहीं! ( उघड सदोबांस ) सदोबा, तुह्मी स्वतः त्या कृष्ण्याकडे जा आणि पैशांची मागणी करा. जर तो देणार नाहीं तर उद्यांच्याउद्यां कोर्टांत फिर्याद द्या. फिर्यादीस जो योग्य खर्च लागेल तो करा. ( स्वगत ) घोड्याची गाडी पाहिजे नाहीं? आयत्या बिळांत नागोबा. पेढी घालून दिली ती आयती तुला घशांत चिणायला सांपडली नाहीं? या सर्व कर्मांचं योग्य शासन भोगण्यास तयार हो. तुझे सर्व ग्रह तुला अनिष्ट झाले आहेत हें ध्यानांत ठेव! ही खात्याची साडेसाती तुझ्या पाठीमागं पुरीच लागली! पैशांची फेड केल्याशिवाय तुझी सुटकाच होत नाहीं! इतका जो हृदयाचा पाषाण त्याला मनुष्य ह्मणायला देखील शरम वाटते! हें जग अशा नीच मनुष्यांनीं भरलेलं आहेसं दिसतं. मान कापणारा माझा स्नेही? व्यर्थ व्यर्थ जन्मलास! वृद्ध माणसं जें जें सांगतात तेंच खरं. बाबांचं न ऐकतां मी आपल्या पोरबुद्धी प्रमाणं वागून केवढातरी अनर्थ करून घेत होतों? परंतु खरोखर त्यांच्याच आशिर्वादानं जगलों! वडिलांचा

आशिर्वाद ह्मणजे परमेश्वराची इच्छा! त्यांच्या वचना बाहेर जाण्याची बुद्धि देवानं मला पुन्हां केव्हांही देऊं नये.

( पडदा पडतो. )

## प्रवेश ४ था.

पात्रें—कृष्णराव व सदोबा.

स्थळ—कृष्णरावाचें घर.

**सदोबा**०—( प्रवेश करून ) पैशाचा लोभ फारच विलक्षण! मला आजपर्यंत खोटी बुद्धि झाली नाहीं हे परमेश्वराचे मजवर अनंत उपकारच आहेत! पैसे खायचं जर मनांत आणलं असतं तर इतक्या काळांत मी लक्षाधीश बनून गेलों असतों; कारण, तात्यासाहेबांचा मजवर पूर्ण विश्वास; त्यांनां महिना महिना गांवास जाण्याचा प्रसंग आला तरी सर्व घर मजवरच टाकून जात! तात्यांना पैशाची जरूर लागली तर तेही मीच देणार. इतकी सत्ता माझ्या स्वाधीन असतां मी मनांत आणलं असतं तें केलं असतं! विश्वासरावांनीं देखील आपल्या वडिलांचाच कित्ता घेतला आहे. ( आठवल्या सारखें करून ) अरे! कृष्णरावाचं घर तर मागें राह्यलं! मी बोलण्याच्या नादांत पुढेंच आलों! ( मागें फिरून ) कृष्णराव घरांत

असला तर ठीकच आहे; नाहींतर पेढीपर्यंत गेलंच पाहिजे. हाक मारून तर पहावी. अहो कृष्णराव, अहो कृष्णराव, घरांत आहे का कुणी ?

कृष्ण–( हांका ऐकून आंतूनच ) कोण आहे ?

सदोबा–दार उघडा; मी आहें सदोबा.

कृष्ण०–उघडतोंहो उघडतों.

( इतक्यांत पडदा उघडतो. )

सदोबा–पैसे काढा अगोदर.

कृष्ण०–( मोठ्या नम्रपणानें ) अहो, प्रथम तुह्मी बसा तर खरे ?

सदोबा–बसाबिसा कांहीं नाहीं; अगोदर पैसे द्या.

कृष्ण०–हो; पण बसा, बसा ?

सदोबा–( बसून ) बसून काय करायचं आहे ? मी इथे वेळ काढण्या करितां आलों नाहीं. अगोदर पैसे द्या मला थांबायला मुळींच अवकाश नाहीं.

कृष्ण०–( हात जोडून ) असे रागाऊं नका सदोबा. मी तुह्मांला खरंच सांगतों, एकदम येवढी रक्कम माझ्या जवळ नाहीं !

सदोबा–अहो, हें जर आपल्याला ठाऊक होतं मग घेतलीत कशाला ? पैसे देतां कीं नाहीं ? एक जवाब सांगा काय तो.

**कृष्ण०**—इतके लाल होऊं नका सदोबा? सध्यां शंभर रुपये देतों मग—

**सदोबा**—( रागाऊन ) किती? शंभर रुपये? अहो, घेतांना सुख वाटलं आणि देतांनां कां चोळाचोळ? ( उठून ) हें पहा, बऱ्या बोलांनीं सगळी रक्कम द्या नाहींतर आजच्या आज कोर्टांत फिर्याद देण्याची मला ताकीद मिळाली आहे. बोला, बोला. उगीच वेळ गमावण्यांत काय अर्थ आहे? ( जाऊं लागतो. )

**कृष्ण०**—( त्यांस फिरवून ) अहो, फिर्यादीवर वेळ आणूं नका हें मी हात जोडून सांगतों!

**सदोबा**—मला नाहीं माहीत. पैसे असतील तर द्या, मी घेतों; नाहींतर धन्याच्या हुकुमा प्रमाणं मला वागलंच पाहिजे. ( जातां जातां ) हें पहा कृष्णराव, विचार करा; पैसे वेळींच द्या; मग जड जाईल. खर्चाचा बोजा मात्र आणखी पडेल अंगावर. मी असाच जाऊन फिर्याद देतों. ( जातो. )

**कृष्ण०**—अहो, जरा इकडे पहा? थांबा; जरा थांबा—

( असें ह्मणत सदोबांच्या पाठीमागून जातो. )

( पडदा पडतो. )

## प्रवेश ९ वा.

पात्रें—न्यायाधीश, चिटणीस, विश्वासराव, कृष्णराव, सदोबा व शिपाई.

स्थळ—कांतिपूरची कचेरी.

( चिटणीस लिहीत बसले असतां पडदा उघडतो.)

सदोबा—( प्रवेश करून ) चिटणीससाहेब, ही विश्वासरावांची फिर्याद आहे.

चिटणीस—( कागद घेऊन ) ठीक आहे. फिर्याद फैलावर घेतल्यावर हजर रहा.

सदोबा—ठीक आहे. ( बाजूस बसतो. )

( न्यायाधीशांचा शिपाई पेटी आणून ठेवतो.)

विश्वास०—( प्रवेश करून ) सदोबा, फिर्याद दिलीत ? ( बसतो. )

सदोबा—होय; आतांच दिली. ( बसतो )

( न्यायाधीश येतात, सर्व उभे राहतात. )

न्यायाधीश—चिटणीस, कोणाचे दावे आहेत ?

चिटणीस—( फिर्यादीचा कागद पुढें ठेऊन ) विश्वासराव नारायणराव यांची कृष्णराव गोपाळ यांजवर साडे सात लाख रुपयांबद्दल खात्यावरून फिर्याद आहे.

न्यायाधीश—( खातें पाहून ) त्यानां हजर करा.

चिटणीस—( शिपायास ) फुकारो विश्वासराव नारायण.

शिपाई—विश्वासराव नारायण हजर है ? (तीन वेळां फुकारतो)

विश्वास०-हजर आहे ( असें ह्मणून पुढें होतो )
चिटणीस-बारमधें उभे रहा
विश्वास०-ठीक आहे. ( बारमधें उभा राहतो. )
चिटणीस-ह्मणा, परमेश्वराचं स्मरण करून खरं सांगेन खोटं सांगणार नाहीं.
विश्वास०-परमेश्वराचं स्मरण करून खरं सांगेन. खोटं सांगणार नाहीं.
चिटणीस-तुमचं नांव काय ?
विश्वास०-माझं नांव विश्वासराव नारायण.
चिटणीस जात ?
विश्वास०-ब्राह्मण.
चिटणीस-उमरवर्षें ?
विश्वास०-पंचवीस.
चिटणीस-राहण्याचं ठिकाण ?
विश्वास०-कांतिपूर.
चिटणीस-धंदा काय करितां ?
विश्वास-सावकारीचा.
न्यायाधीश-तुमचें या फिर्यादी संबंधानें काय ह्मणणें आहे ?
विश्वास०-मी कृष्णराव गोपाळ यास साडेसातलाख रुपये दिले त्याबद्दल त्यानें मला स्वदस्तूरचें खातें पाडून दिलें आहे. परंतु त्याच्याकडून मुदतशीर पैसे न आल्यामुळें माझा त्याच्यावर दावा आहे. तरी कोर्टानें

कृपाळू होऊन त्याजवर भरपाईचा निवाडा द्यावा येवढीच विनंती आहे.

( जाग्यावर येऊन बसतो. )

चिटणीस-(शिपायास) फुकारो कृष्णराव गोपाळ.

शिपाई-कृष्णराव गोपाळ हजर है ? (तीन वेळां फुकारतो)

कृष्ण०-हजर आहें.

चिटणीस-असे बारमधें उभे रहा.

कृष्ण०-होय साहेब. (बारमधें उभा राहतो)

चिटणीस-ह्मणा ; परमेश्वराचं स्मरण करून खरं सांगेन खोटं सांगणार नाहीं.

कृष्ण०-परमेश्वराचं स्मरण करून खरं सांगेन. खोटं सांगणार नाहीं.

चिटणीस-तुमचं नांव काय ?

कृष्ण०-माझं नांव कृष्णराव गोपाळ.

चिटणीस-जात ?

कृष्ण०-ब्राह्मण.

चिटणीस-उमरवर्षं ?

कृष्ण०-तेवीस.

चिटणीस-राहण्याचें ठिकाण ?

कृष्ण०-कांतिपूर.

चिटणीस-धंदा ?

कृष्ण०-व्यापार.

न्यायाधीश–( खातें हातांत देऊन ) हें खातं तुमच्या ओळखीचं आहे काय ?

कृष्ण०–होय माझ्या ओळखीचं आहे आणि हं मीच लिहून दिलं आहे.

न्यायाधीश–सही तुमचीच आहे काय ?

कृष्ण०–होय माझीच. मीच स्वतःकेली आहे.

न्यायाधीश–किती रुपयांचं खातं आहे ?

कृष्ण०–साडेसातलाख रुपयाचं.

न्यायाधीश–त्यापैकीं किती रकमेची भरपाई केलेली आहे?

कृष्ण०–भरपाई मुळींच केलेली नाहीं.

न्यायाधीश–मग ही रक्कम तुम्हाला देणं कबूल आहे ?

कृष्ण०–होय मला कबूल आहे.

चिटणीस–( जबानी वाचून दाखवून ) आहे बरोबर ? ( सहीस कागद पुढें करतो )

कृष्ण०–होय आहे. ( सही करून जाग्यावर बसतो )

चिटणीस–वादीचा पुरावा हजर आहे.

न्यायाधीश–रिणकोस देणं कबूल आहे. आणखी पुराव्याची जरूर नाहीं. ( कायद्याचीं पुस्तकें चाळून निकाल लिहितो. )

चिटणीस–( निकालाचा कागद घेऊन ) दुतर्फी मुकदम्यांत हुकुमनामा वाचतो; हुकुमनामा निशाणी नंबर एकशेपांच कांतिपूर येथील न्यायाधिशांचे कचेरींत. मुक्काम कांतिपूर येथें रजिष्टर दिवाणी मुकदमा नंबर

तीनशेंपंचवीस शके १२०३ पैकीं विश्वासराव नारायण जात ब्राह्मण धंदा सावकारी उमरवर्षें पंचवीस राहणार कांतिपूर. विरुद्ध कृष्णराव गोपाळ जात ब्राह्मण धंदा व्यापार उमर वर्षें तेवीस राहणार कांतिपूर हा खुद्द हजर असोन फिर्याद दाखल मिती जेष्ट शुद्ध नवमी शके १२०३ फैल मिती मजकूर. दावा रुपये साडेसातलक्ष रुपये. वादीचा दावा असा आहे कीं, प्रतिवादी यानें साडेसातलाख रुपयांचें खातें पाडून देऊन रक्कम नेली ती मिळावी ह्मणोन. मिती मजकूर रोजीं वादी व प्रतिवादी यांचे समक्ष निकाल देण्यांत येतो कीं—प्रतिवादी कृष्णराव गोपाळ यानें वादी विश्वासराव नारायण ह्यांस रुपये साडे सातलाख व खर्च रुपये तीस हजार मिळोन सातलक्ष ऐंशींहजार रुपये तावडतोब द्यावेत. न दिल्यास वादीनें प्रतिवादीची जंगम व स्थावर मिळत विकून आपल्या रकमेची भरपाई करून घ्यावी. सर्व भरपाई इष्टेटींतोन न झाल्यास राहिलेली रक्कम प्रतिवादीचे जातीवर वसूल करावी. आज मिती जेष्ठ शुद्ध नवमी शके १२०३ रोजीं आमचे सही शिक्यानिशीं वादीस निवाडा दिला आहे.

( कोर्ट उठतें व पडदा पडतो. )

## प्रवेश ६ वा.

पात्रें-सदोबा, वेलीफ, कृष्णराव, मन्या व शिपाई.

स्थळ-कृष्णरावाची पेढी.

( कृष्णराव पेढीवर बसला असतां पडदा उघडतो )

कृष्ण०-( स्वगत ) लक्ष्मी किती चंचल आहे ! माझ्या जवळची इतकी संपत्ति नष्ट व्हावी ना ? साडेसात लाखांनां आज मी महाग व्हावं काय ? घर फिरलं कीं घराचे वांसे सुद्धां फिरतात हें अगदी सत्य आहे. संपत्ति मिळवतांनां किती प्रयास पडतात ! किती युक्त्या योजाव्या लागतात ! वेळ सुद्धां फार लागतो ! पण एकदां ती जायला लागली ह्मणजे तिला हजार वाटा फुटतात ! लोक विचारीनासे होतात ! परमेश्वरा, दरिद्री होऊन दिवस काढण्यापेक्षां मृत्यू बरा ! विश्वासरावाचा निवाडा तर झालाच. ह्या येवढ्या भयंकर रकमेची फेड माझ्या जिनगींतून होणं कठीण दिसतं ! पेढींत फार झालं तर पांच चार हजार रुपयांचा माल शिल्लक निघतांनां मारामार ! मोठ मोठ्यांकडे उधारीच्या रकमा तशाच राहणार. अशावेळीं त्यांनां तरी चांगलंच फावलं ! विश्वासरावानं सर्व जिनगीचा फडशा उडवल्यावर मला राहला ठिकाण व पोटभर अन्न सुद्धां मिळण्याची पंचाईत पडेल ! येवढ्या

कुटुंबाचं आतां कसं होणार ! ( विचार करून ) अरे ! मी चांगला मर्दा सारखा मर्द असून असा रडत बसूं ? छेः जी एकदां विश्वासरावाच्या विरुद्ध बाजू उचलली ती शेवटास नेलीच पाहिजे. पेढीवरचा सगळा माल गणपतरावांनां विकून टाकून त्यांच्याच कडे ठेव अमानत ठेवावी ह्मणजे विश्वासरावाच्या हाताला कांहींच लागणार नाहीं. अरेरे, फार वाईट झालं ! किती मूर्ख मी ? कोर्टांतच नाकबूल गेलों असतों तर फार चांगलं झालं असतं. आधींच ही अक्कल सुचायला पाहिजे होती; पण आतां काय ? माझ्यावर आलेल्या प्रसंगाची संधी पाहून गणपतराव अमानत ठेवीला नाकबूल गेला तर ? तर काय, तो नाकबूल जाणारच ! हें पण नाहीं जुळणार ! ( विचार करून ) छे छेः आपलं कर्म फिरलं आहे विश्वासरावापुढें आपला टिकाव लागणार नाहीं ! त्यापेक्षां त्याचेच पाय धरावे मग पाहावं त्याला दया आली तर !

( इतक्यांत सदोबा, मन्या, बेलीफ व शिपाई येतात )

बेलीफ–( हातांत कागद घेऊन ) कृष्णराव गोपाळ तुह्मीच ?

कृष्ण०–होय मीच. ( स्वगत ) आली वाटतं धाड ! काय होईल तें होईल !

बेलीफ-ही पेढी कोणाची ?

कृष्ण०-आँ, ही पेढी विश्वासरावांची आहे पण-

सदोबा-पण काय ? सील तुमचंच होतं ना ? ( बेलीफास ) अहो तुह्मी ह्या भामट्याचं मुळींच मनावर घेऊं नका. ही त्याचीच पेढी आहे; करा जप्त करा.

बेलीफ-तुमची खात्री असेल तर जप्त करतों.

सदोबा-खात्री ? ही ह्याचीच पेढी आहे हें मी खात्रीनं सांगतों. पूर्वीच्या भानगडी आतां कशाला पाहिजेत. तुह्मी जप्त करा.

बेलीफ-कृष्णराव, तुमचेवर विश्वासराव नारायण यांचा हकुमनामा निशाणी नंबर एकशेंपांचचा झाल्यावरून कोर्टाच्या हुकमानें ही तुमची पेढी जप्त केली आहे. चला खालीं उतरा पेढीवर कोर्टमार्फत सील होणार. (शिपायास) शिपाई पेढी बंद करून सील कर.

( शिपाई पेढी बंद करून सील करतो व पडदा पडतो. )

## प्रवेश ७ वा.

पात्रें-विश्वासराव, सुशीला, सोन्या, कृष्णराव, व मन्या.

स्थळ-विश्वासरावाचा दिवाणखाना.

कृष्ण०-( प्रवेश करून ) हाय, हाय ! दुर्दैवा ? तूं तर कमाल केलीस ! मला आतां जगांत राहण्याची मुळींच इच्छा नाहीं. प्रभो, ह्या वेळेस मजवर वीज

पाडून माझं भस्म करून टाक! हे भू माते तूं तरी कृपाळू होऊन एकदम दुभंग हो आणि मला पोटांत घे! नको ह्या मृत्युलोकचा वास नको! परमेश्वरा, अशी दुष्टबुद्धी मला कां दिलीस? त्या विश्वासरावाचा मी दुष्टानं विनाकारण छल केला! मी तरी जातीचा दुष्टच काय? (विचार करून) छे, छेः हे सगळे खास दुर्दैवाचे फेरे! ज्यानं मला भाऊ मानला त्याचा मी चांडाळानं घात करायला तयार व्हावं? शिव शिव! घातक्या कृष्णरावा, तुझी जोड करणारा जगांत एकतरी सांपडेल काय? मी जन्मास तरी कशाला आलों? अस-ल्या दुष्टकृतीचा धडा घालायाला? धिःकार धिःकार!! अभाग्या कृष्णरावा! कृतकर्मांचीं फळं भोगण्यास आनं-दानं तयार हो! परमेश्वरा, मला जन्म देऊन व्यर्थ फसव-लंस! सर्व जगाकडे न्यायानं पहात असतां तूं माझाच अव्हेर कां करावास? मला वाईट बुद्धी देऊन माझ्या हातून घोर कृत्यं कां करवलींस? प्रभो, माझ्या सारखा प्रसंग प्रत्यक्ष वैऱ्यावर सुद्धां येऊं नये येवढंच माझं मागणं आहे! हाय! हाय! ही दुष्टकृतीची आठवण झाल्याबरोबर सर्व शरीर अगदीं थिजून जातं! पण परमेश्वराला तरी दोष कां द्यावा? माझंच दुर्दैव! मी पूर्व जन्मीं केलेल्या कर्मांचीं फळं ह्या जन्मांत भोगावीं लागताहेत हेंच खरं! दुर्दैवा! मला झालं हें शासन पुरे! आतां ह्यापुढें तरी अशीं अश्लाघ्य व अमानुष

कर्म करण्याची कल्पना मला न शिवो! विश्वासरावा इतकं तुझं मजवर प्रेम असतां ह्या पाषाणहृदयी कृष्णरावानं तुझ्या प्राणावर उठावं काय? छेछेः आतां मजवर रागाऊं नको! मला तुजवांचून आधारच उरला नाहीं. मजपुढें मूर्तिमंत निराशाच उभी आहे! काय ही माझी अवस्था! अन्नाची मोताद पडली! दाराशीं सुद्धां कोणी उभा करीत नाहीं! जो तो बोचबोचून खातो आहे! हे नरपशो कृष्णरावा, अजून तरी डोळे उघड? नाहीं; विश्वासरावाचे घट्ट पायधरल्या शिवाय उपायच नाहीं! ( जातो. )

( विश्वासराव व सुशीला बसलीं आहेत व बाजूस सोन्या व मन्या उभे आहेत असा पडदा उघडतो. )

**सुशीला**—आताशें स्वारींचं मन स्थिर कां नाहीं? कारण तरी काय आहे असं?

**विश्वास०**—अग, कारण कसलं? तो कृष्णग्रह माझ्या पाठीस लागला आहे ना?

**सुशीला**—तो मला जीवावर तर उठला आतां आणखी काय करायचं राहलं आहे अझून! त्याचा कांहीं तरी बंदोबस्त तरी एकदां करायचा होता? नाहींतर मेला कोणच्या वेळेला काय करील ह्याचा भरंवसा का आहे कांहीं?

**विश्वास०**—अशी भितेस काय? आतां खूप नरम आला

आहे. तुला मुळींच काळजी नको. गुलामा कडून साडेसातलाख रुपये तर ठोकून घेतलेच; बाकी राहिलेले वसूल झाले तर ठीकच आहे. पण त्याच्याजवळ कांहींच उरलं नाहीं. घरादाराचा सुद्धां अगदीं फडशा उडाला. हा सोन्या होताच त्या बेलीफा बरोबर.

**सोन्या**–व्हय व्हय; बाईसायेब मी व्हतो त्येंच्या संग. आमी जवा का घरावर जप्ती घ्येऊनशान ग्येलो तवा तो म्हातारा न्हव का आन समदीं बायकामानसांन् पोरांबालां अक्षि ओक्सा बोक्शी रडाया लागली. अन् त्यो म्हातारा तर ल्योकाला श्या घेऊघेऊन रडत व्हता! त्या मानसानां कुठ बसायाबी जागा न्हाई आन् खाया तर येक दाना बी न्हायला न्हाई बगा! अक्षि चिव चिव चालीवली हाये!

( कृष्णराव येतो )

**कृष्ण०**–विश्वासराव, मला वांचवा हो वांचवा ( असें म्हणून विश्वासरावाचे पाय घट्ट धरून रडूं लागतो. )

**विश्वास०**–( त्यास रागानें लाथेनें उडवून ) हा घातक्या! हो पलीकडे. तुझ्या मुखावलोकनाची बिलकुल इच्छा नाहीं!

**कृष्ण०**–विश्वासराव, माझ्या कृत्यांचा मला पूर्ण पश्चात्ताप झाला आहे! मला क्षमा–

**विश्वास०**–चल चालता हो. बेशरम, माझी पायंडी चढतांनां विचार नाहीं केलास? मन्या, पाहतोस काय?

लाथा मारून दे गाढवाला हाकलून, निर्लज्ज ! माझे पाय धरायला आला आहे ! नीचा, माझा प्राण घेऊं पाहणारा तूंच चांडाळ ? (मन्यास) कायरे, जुन्या धन्याची कींव येते आहे कीं काय ? मार लाथ.

मन्या—व्हाई धनी सायेब. ( असें ह्मणून कृष्णरावास लाथ मारून हाकलतो. )

कृष्ण०–(फार दुःखानें स्वगत) हा दुर्दैवा ! किती विलक्षण सपाटा हा ! माझ्याच चाकराच्या लाथा मला खायची वेळ यावी ना ? हाय ! हाय ! कृष्ण्या, तूं जन्मास येऊन असा कुलांगार कसा निपजलास ? आतां ह्यांनीं माझा जीव घेतला तरी पाय सोडून उपयोग नाहीं ( विश्वासरावाचे पुन्हां पाय धरून उघड ) विश्वासराव, मला तुमच्या वाचून कोणीही त्राता नाहीं माझे सर्व अपराध पोटांत घालून मला क्षमा करा !

विश्वास०—चल निघ कोडग्या ! ( त्यास लाथेनें लोटतो )

कृष्ण०—विश्वासराव, माझ्या प्राणाचे मालक तुह्मीच आहांत ! काय वाटेल तें करा ! मी शरण आहें ! दया येऊंद्या माझी ! ( पाय धरतो )

विश्वास०–( स्वगत ) काय करावं ? ही ह्याची स्थिति पाहून मला कींव येते ! ( विचार करतो )

सुशीला–-विचार कसला करायचा ! त्या मेल्या मांगाचं थोबाड सुद्धां दिसायला नको ! ( स्वगत ) इकडचा स्वभावच दयाळू.

कृष्ण०–( सुशीलेचे पाय धरून ) हे भगिनी, ह्या दुष्टानं तुझा फार छल केला पण ह्या पुढें माझ्या हातून असं कधींच होणार नाहीं ! मला झालं येवढं शासन पुरे ! भगिनी आतां मजवर दया करून मला पवित्र करून घे !

सुशीला–( लाथेनें लोटून ) मेल्या, नको तें थोबाड दाखवूं.

कृष्ण०–( विश्वासरावाचे पाय धरून ) विश्वासराव माझी दया नाहीं का येत ?

विश्वास०–( स्वगत ) जरी हा माझा वैरी आहे तरी ह्याला होत असलेलं दुःख मला पाहववत नाहीं ! ( उघड ) कृष्णरावा, ऊठ ऊठ. ( त्यास उठवतो )

सुशीला–(स्वगत) तरी मी ह्मटलंच इकडे दया येईल ह्मणून !

कृष्ण०–आतां आपणच माझे मायबाप.

विश्वास०–जास्ती बोलूं नकोस. विचारीन तेवढ्याचंच उत्तर दे. राहिलेल्या पैशांची काय वाट ?

कृष्ण०–विश्वासराव, मजजवळ कांहींही उरलं नाहीं !

विश्वास०–( रागानें ) चोरा, माझ्या जवळ कांहीं उरलं नाहीं ह्मणून तोंड भरून सांगतो आहेस ? शरम नाहीं वाटत ? पैसे कोण तुझा बाप फेडील ? त्याच्याजवळ तरी काय आहे ? कुलांगारा, ह्यातार्‍याला सुद्धां भीक मागायची पाळी आणलीस आणि पैसे नाहींत ह्मणून ह्मणतोस ? चाकरी करून फेड पैसे.

**कृष्ण०**—मी आतां लाचार झालों! आपली चाकरी मी आनंदानं करतों. इतकंच नव्हे तर हा प्राण तुमच्या हवाली केला आहे!

**विश्वास०**—माझ्याकडे तुला शागीर्दाचं काम देतों. कामांत कुचरपणा केलास तर चाबकानं पाठ फोडून काढीन. हें कबूल असेल तर बोल.

**कृष्ण०**—( हात जोडून ) मला कबूल आहे.

**विश्वास०**—जा तर आपल्या कामाला. ह्या पुढें तरी नीट रहा.

**कृष्ण०**—होय. ( सुशीलेस ) बाईसाहेब, ह्या लेंकराला संभाळून घ्या! ( जातो )

( पडदा पडतो. )

## प्रवेश ८ वा.

**पात्रें**-विश्वासराव, सुशीला, कृष्णराव व मन्या.
**स्थळ**-विश्वासरावाचा दिवाणखाना.

( सुशीला बसली असतां मन्या उभा आहे असा पडदा उघडतो. )

**सुशीला**-मन्या सांपडलं का तें मोतीं?

**मन्या**—न्हाई बाईसायेब न्हाई गवसत!

**सुशीला**-त्या मेल्या कृष्ण्याला विचारलंस का पण?

**मन्या**-व्हय इच्यारलां तर. पन त्योबी न्हाईच ह्मनतो.

**सुशीला**–नाहीं ह्मणेल तर काय झालं. मेला हाडाचाच चोर ! जित्याची खोड मेल्याशिवाय का जायची आहे? तिकडे कानावर घातल्याशिवाय तो कबूल कुठला यायला !

( इतक्यांत विश्वासराव येतो )

**सुशीला**–( उभी राहून ) त्या मेल्यावर येवढी दया कशाला हवी करायला ? नसतं विकत श्राद्ध घ्यायचं ! त्याचा स्वभाव कध्धीं सुद्धां जायचा नाहीं.

**विश्वास०**–होय पण त्यानं केलं तरी काय ? ( बसतो )

**सुशीला**–माझ्या बुगडीचं मोतीं कांहीं केल्या सांपडत नाहीं ! त्या मेल्याशिवाय का तें गेलं आहे ? इतके दिवस माझी एक सुद्धां वस्त हरवली नाहीं !

**विश्वास०**–( मन्यास ) जारे त्याला इकडे बोलाव.

**मन्या**–जी व्हय. ( असें ह्मणून त्याला घेऊन येतो )

( कृष्णराव येतो )

**विश्वास०**–( कृष्णरावास पाहून ) कायरे, मोतीं काय झालं ?

**कृष्ण०**–मला नाहीं माहीत !

**विश्वास०**–खरं बोल.

**कृष्ण०**–खरोखर मला नाहीं सांपडलं !

**विश्वास०**–घेतलं असलंस तर बऱ्या बोलानं कबूल ये.

**कृष्ण०**–( स्वगत ) दैवहीन मनुष्यावर कोणत्या वेळेला कसा प्रसंग येईल याचा नियमच नाहीं ! मी

तें पाहिलं सुद्धां नाहीं असं असून तें गेल्याचा आळ माझ्यावरच ? जन्मास येऊन सगळे संस्कार देहाला लागताहेत ! दुर्दैवा, तुझी धांव अझून किती लांब आहे ? ( उघड ) विश्वासराव, मी फुटक्या नशीबा-चाच आहें. मी खरंच सांगतों मला तें माहीत देखील नाहीं !

विश्वास०—चोरा, तुला अशी स्थिति आली तरी मूळस्व-भाव जात नाहीं ? ( रागानें ) खरं बोलतोस कीं नाहीं?

कृष्ण०—नाहीं हो नाहीं मी मुळींच घेतलं नाहीं !

विश्वास०–( स्वगत ) हा सामोपचारानं कबूल येण्याचा रंग दिसत नाहीं; मूर्खाला टोणपेच पाहिजेत. मन्या, ह्याला उघडा करून चाबकाचे पंचवीस फटके चढव. हरामखोर !

मन्या—जी व्हय. ( त्यास फटके देतो )

कृष्ण०—( पाठचोळीत स्वगत ) शाबास ! दुर्दैवा शाबास ! हरहर ! ( उघड ) विश्वासराव मी नाहीं घेतलं हो नाहीं घेतलं !

विश्वास०—कबूल येई पर्यंत फटके-दे. चढव थांबू नको.

कृष्ण०—हाय हाय ! मी नाहीं घेतलं.

( कृष्णराव बेशुद्ध पडतो व पडदा पडतो )

## प्रवेश ९ वा.

पात्रें-विश्वासराव, कृष्णराव व मऱ्या.

( विश्वासराव विचार करीत बसला आहे. )

**विश्वास०**-( स्वगत ) मेरूपर्वताचं तळहातावर चूर्ण करतां येईल ! पृथ्वीचा चेंडू करून खेळण्यास हरकत पडणार नाहीं; सप्तसमुद्रांचं उल्लंघन सहज करतां येईल; परंतु मूळस्वभाव मात्र बदलतां येणं शक्य नाहीं ! कसाही बीरमंत्री असला तरी त्याच्यानें हें भूत निघणार नाहीं ! इतक्या हाल अपेष्टा होत असून त्यानं आपली कृति अव्याहत चालू ठेवावी काय ? मार खातां खातां बेशुद्ध झाला तरी सुद्धां कबूल होत नाहीं ह्मणजे नवल नाहींतर काय ? (विचार करून ) अथवा, त्यानं चोरलंच नसेल तर कबूल तरी कसं करणार ? चोरलं नसतां हो ह्मणेल ? कानफाट्या नांव मिळाल्या बरोबर त्याच्या विश्वासानं दडी मारलीच ! काय असेल तें असो !

( इतक्यांत मऱ्या येतो )

**मऱ्या**-( घाबरत प्रवेश करून ) धनी सायेब, तकड तो आपली मान कापुनशान घ्येतोया !

**विश्वास०**-( चपापून ) कोण, कोण ? कृष्णराव ? कां ? ( स्वगत ) होय; त्याला दुःख सहन न होऊन आत्महत्या करीत असेल ! असं करील तर त्याबद्दलचं

पातक मजवरच येईल! छे, छेः! पण त्यानं प्राण दिला तर नसेल ना? (उघड) कुठे, आहे कुठे तो? चल दाखव.

(दोघे जातात.)

(कृष्णराव आत्महत्येच्या विचारांत आहे असा पडदा उघडतो)

कृष्ण०—(हातांतील शस्त्रास उद्देशून) हे मित्रा, माझ्या ह्या अमंगल देहावर ममता करणारा तुजवांचून दुसरा कोणीच नाहीं. आतां विलंब करूं नको. माझ्या ह्या अपवित्र देहाचा स्पर्श ह्या पवित्र भूमातेला एक क्षणभरही नको! हे जगन्नियंत्या, तुला मी हा शेवटचाच नमस्कार करतों. (नमस्कार करून) यापुढें मजसारखा दुर्धर प्रसंग कोणावरही न येवो! मरतां मरतां तरी माझी बुद्धि निर्मळ झाली हे मजवर अगणित उपकार केलेस (शस्त्रास) शस्त्रा, हं आटप; उशीर नको. माझ्या कृतीनं भ्रष्ट झालेल्या पितरांनो, तुह्मांला मजकरितां अतिकष्ट सोसावे लागल्याबद्दल मला क्षमा करा!

विश्वास०—(आडून, स्वगत) ह्याचं अंतःकरण निर्मल झालं यांत शंकाच नको. शाबास! कृष्णरावा, ह्या तुझ्या पश्चात्तापानं तूं खास पवित्र झालास!

कृष्ण०—हे भूमाते, तुला भारभूत झालेल्या ह्या जडदेहाला नाहींसा करतों ( शस्त्र मारून घेऊं लागतो.

विश्वासराव पुढें होऊन त्याचे हात धरतो. )

विश्वास०— ( त्याचे हात धरून ) मित्रा, थांब थांब. असं साहस करूं नकोस !

कृष्ण०—( विश्वासरावाकडे पाहून ) कोण, विश्वासराव ? माझ्या आड येऊं नका !

विश्वास: ( प्रेमानें ) कृष्णरावा, झाल्या गोष्टींचा खेद करूं नकोस. तुझं वर्तन आतां खरोखर सुधारलं.

कृष्ण०—सोडा, सोडा; विश्वासराव, मी दुष्टानं मरावं हेंच उचीत ! सोडा !

विश्वास०—छे छेः असं ह्मणूं नको. हा विचार सोडून दे. आजपासून तूं माझा धाकटा भाऊच. तुला झालं हें शासन योग्यच झालं ! आणि ह्मणून हा सुदीन दो- घांनां पाहाण्याचा योग आला ! अविचार करूं नको !

कृष्ण०— ( विश्वासरावाच्या गळ्यास मिठी मारून ) विश्वासराव, धन्य आहे तुमची ! इतका मी तुमच्या विरुद्ध वागलों तरी शेवटीं प्राण वांचवायला तयार आहांच ना ? मी तुमच्या बाहेर नाहीं ! ( शस्त्रास ) मित्रा, माझा जिवलग मित्र तुझ्या माझ्या मित्रत्वाची इच्छा करीत नाहीं त्या पेक्षां तुझा त्याग करणं भाग पडत आहे. ( शस्त्र टाकून देतो )

**विश्वास०**–कृष्णा, आहे हें दोघांचंच आहे. बाबांकडे जाऊन ही आनंदाची वार्ता त्यांनां सांगूं चल. ( जाऊं लागतो )

**कृष्ण०**–चला ( जातां जातां ) परमेश्वरा, तुझ्या लीला अगाध आहेत ! मला योग्य शासन करून पवित्र केल्या बद्दल मी सर्वदा तुझा ऋणी आहें ! मजसारखी दुष्टबुद्धि कोणासही देऊं नको येवढेंच माझें मागणें आहे !

( दोघे जातात व पडदा पडतो. )

